


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






## अनुक्रमणिका



**संपादक :** प्र.ना. परांजपे
**संपादन सल्लागार :** अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
**संपादन-समिती :** प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१.

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तसेच मैसूर येथील भारतीय भाषा संस्थान यांचेही अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन, तसेच भारतीय भाषा संस्थान सहमत असतीलच असे नाही.

**या अंकाचे मूल्य रु. २५/-**

संपादकीय

# मराठीच्या विकासाच्या वाटा - ४ : शब्दकोश

माझ्या एका संपादकीयात मी 'अंदाजपंचे धागोदरसे' हा वाक्प्रचार वापरला होता. एका जागरूक वाचकाने हा वाक्प्रचार कोणत्या कोशात सापडेल अशी दूरध्वनीवरून विचारणा केली. माझ्या बोलण्यात व ऐकण्यात तो लहानपणापासून असल्यामुळे प्रमाण मराठीच्या भाषकाला तो अपरिचित असेल व त्यासाठी कोशामध्ये त्याचा शोध घ्यावा लागेल असे माझ्या ध्यानीमनीही नव्हते, पण त्या पृच्छेमुळे दाते-कर्वे यांच्या महाराष्ट्र शब्दकोशापासून म्हणी-वाक्प्रचारांच्या कोशांपर्यंत त्याचा शोध घेतला; पण कुठेही तो आढळला नाही. सुदैवाने एका व्याकरणतज्ज्ञ पंडिताच्या ऐकण्या-बोलण्यात तो आहे असे कळले, त्यामुळे तो वाक्प्रचार फक्त माझ्याच व्यक्तिगत भाषेचा घटक नसून दक्षिण महाराष्ट्राच्या (घाटी ?) बोलीतील तो वाक्प्रचार आहे हे माझ्या लक्षात आले.

शब्द, म्हण, वाक्प्रचार इत्यादींबद्दल माहिती घेण्यासाठी माणूस कोशाकडे वळतो. शंका, मतभेद, वाद यांच्यातून मार्ग काढण्यासाठी कोशाशिवाय गत्यंतर नसते. पण नित्य वापरातले, वाचनातले शब्दही कोशात नसतील तर माणूस हतबल होतो.

मराठीतला पहिला शब्दकोश मोल्सवर्थने अनेक पंडितांच्या साहाय्याने तयार करून १८३१मध्ये प्रसिद्ध केला. गेल्या पावणेदोनशे वर्षांच्या इतिहासात त्याच्या तोडीचा किंवा त्याच्या जवळपासही येऊ शकेल असा कोश आजपर्यंत झालेला नाही. अर्थात तो कोश मराठी शब्दांना इंग्रजी प्रतिशब्द देणारा होता. त्याची दुसरी आवृत्ती १८५३मध्ये प्रसिद्ध झाली. तिच्यात ६०हजार शब्द आहेत. वा.गो. आपटे यांचा 'मराठी शब्दरत्नाकर' हा कोश १९२० साली प्रसिद्ध झाला. त्याच्या प्रदीर्घ प्रस्तावनेत आपट्यांनी मोल्सवर्थचा (व कँडीचा इंग्रजी-मराठी) कोश इंग्रजी शासनानुकूल (म्हणजे आजच्या परिभाषेत 'वसाहतवादी') आहे असे दाखवून देऊन त्यावर कडक टीका केली आहे. त्यानंतर य.रा. दाते व चिं.ग. कर्वे यांचा 'महाराष्ट्र शब्दकोश' १९३२ ते १९५० या काळात सात खंडांत प्रकाशित झाला. अलीकडे ह.अ. भाव्यांनी त्याला आठव्या खंडाची जोड देऊन तो पुनःप्रकाशित केला आहे. प्र.न. जोशी यांचा 'आदर्श मराठी शब्दकोश' (१९७०) व द.ह. अग्निहोत्री यांचा 'अभिनव मराठी शब्दकोश' (१९८२-८५) हे अलीकडील आणखी दोन प्रयत्न.

मराठीत इतरही अनेक कोश आहेत. त्यांची माहिती व.वि. कुलकर्णी यांच्या लेखात

(समाविष्ट : 'कोश व सूचीवाङ्मय : स्वरूप आणि साध्य' १९९७ राज्य मराठी विकास संस्था, मुंबई) व डॉ. सदाशिव देव यांच्या 'कोशवाङ्मय विचार आणि व्यवहार' या ग्रंथात आढळेल. (डॉ. देव यांच्या ग्रंथाला महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक गेल्या वर्षी देण्यात आले आणि त्याचे परीक्षण याच अंकात दिले आहे.) त्यामुळे त्या तपशिलात जाण्याचे कारण नाही. पण एक गोष्ट स्पष्ट आहे की मराठीतील कोशनिर्मितीचे बहुसंख्य प्रयत्न एकांड्या शिलेदारीच्या पद्धतीचे आहेत. त्यांच्यात सातत्य नाही. मराठीतील एकाही प्रकाशन-संस्थेचा कोशनिर्मिती विभाग आहे, असे आढळत नाही. त्यामुळे प्रकाशित झालेल्या कोशांतील त्रुटी दूर करणे, चुका दुरुस्त करणे, नवीन शब्दांची भर घालणे, वेगवेगळ्या वाचकगटांसाठी त्यांच्या वेगवेगळ्या आवृत्त्या तयार करून प्रकाशित करणे ही आवश्यक सातत्यपूर्ण प्रक्रिया सुरूच होत नाही; मग ती चालू तरी कशी राहणार ?

शब्दकोश व भाषेचा विकास काही प्रमाणात परस्परावलंबी असतात. मराठी भाषेच्या अस्तित्वाचे पुरावे (ताम्रपट, शिलालेख, इ०) सुमारे एक हजार वर्षांपासून मिळत असले आणि गेली आठशे वर्षे तिच्यात ग्रंथरचना होत असली तरी शब्दकोशांचा इतिहास पावणेदोनशे वर्षांपूर्वीपर्यंतच जावा, यावरून भाषेच्या विकासाचे एक चिन्ह म्हणजे शब्दकोश असे म्हणता येईल. (शिवाजी महाराजांनी राज्य व्यवहार कोश तयार केला; पण त्याचे उद्दिष्ट व स्वरूप मर्यादित होते.) याचाच दुसरा भाग असा की भाषेतील 'सर्व' शब्दांचा समावेश असलेला कोश तयार झाल्याखेरीज भाषेच्या विकासाचे ठोस मोजमाप उपलब्ध होऊ शकणार नाही.

भाषेतील 'सर्व' शब्द कसे गोळा करायचे ? ताम्रपट, शिलालेख, सर्व विषयातील प्रकाशित ग्रंथ, विविध प्रादेशिक, व्यावसायिक, जातीविशिष्ट बोली यांमधील शब्द नोंदल्याशिवाय भाषेतील 'शब्दनिधी' (कॉर्पस) सिद्ध होत नाही. हे प्राथमिक पण अतिशय महत्त्वाचे काम मराठीच्या बाबतीत झालेले नाही. हे एकट्यादुकट्याचे काम नाही आणि ते पाचदहा वर्षांत संपणारेही नाही. त्यासाठी शासन, उदार धनिक, कष्टाळू संशोधक व उत्साही युवक यांची मोट बांधली पाहिजे. या संदर्भात इंग्रजी कोशांचे उदाहरण देता येईल. ऑक्सफर्ड कोशासाठी शब्दांची लाखो कार्डे तयार करून शब्दनिधी तयार करण्यात आला. इतर प्रकाशकांनी कोशनिर्मिती सुरू केली तेव्हा त्यांनी आपापले शब्दनिधी तयार केले. आता मात्र हे सर्व शब्दनिधी एकत्र करण्यात आले आहेत व कोणत्याही प्रकाशकाला काही शुल्क भरून तो निधी वा त्यातील हवा तो गट उपलब्ध होऊ शकतो. त्या शुल्कातून शब्दनिधीचे व्यवस्थापन, वर्गीकरण, विश्लेषण व नवीन संकलन होत राहते. त्यामुळे एखादा शब्द केव्हा वापरात आला

(वा वापरातून गेला) ही माहिती, त्याचे विविध अर्थ व्यक्त करणारी उद्धृते, त्याची व्युत्पत्ती, त्याच्या वापराची वैशिष्ट्ये (सभ्य/ग्राम्य, शहरी/ग्रामीण, प्रमाण/प्रमाणेतर, ग्रांथिक/बोलभाषिक, शिक्षित/अशिक्षित) अशी सामाजिक वैशिष्ट्ये, व्याकरणीय वैशिष्ट्ये, त्याचे विविध उच्चार, त्याची वारंवारिता - एकूण शब्दनिधीशी त्याचे वापराचे प्रमाण (फ्रीक्न्सी) इ० तथ्ये उपलब्ध होऊ शकतात आणि कोशाच्या संपादक-चमूला आपला अपेक्षित व लक्ष्य वाचकवर्ग लक्षात घेऊन आपल्याला उपयुक्त असणाऱ्या वैशिष्ट्यांची निवड करता येते.

शब्दनिधीच्या नंतर क्रम असतो संपादक-चमूचा. कुठलाही एक माणूस शब्दाचा अर्थ, व्याकरण, उच्चार, उपयोग, इतिहास, व्युत्पत्ती अशा सर्व बाबतीत तज्ज्ञ असण्याची शक्यता फार कमी, त्यामुळे त्या त्या बाबतीत तज्ज्ञ असणाऱ्या एक वा अधिक व्यक्तींना कोशाच्या संपादनात सामील करून घ्यावे लागते. याचाच अर्थ असा की संपादनाचे काम एकांडा शिलेदार करू शकत नाही; त्यासाठी समंजसपणाचे सांघिक काम करू शकणाऱ्या तज्ज्ञांचा चमू आवश्यक असतो.

संपादनानंतर मुद्रण, प्रकाशन, विक्री, सातत्यपूर्ण सुधारणा व वेगवेगळ्या लक्ष्य वाचकवर्गांसाठी (उदाहरणार्थ, विद्यार्थ्यांसाठी, लेखकांसाठी, सामान्य वाचकांसाठी, विशिष्ट विषयाच्या वाचकांसाठी इ०) वेगवेगळे कोश सिद्ध करत राहणे या गोष्टी येतात. वितरण व विक्री क्रमाने शेवटी पण अस्तित्वासाठी अत्यावश्यक असलेल्या गोष्टी येतात.

या सर्व खटाटोपासाठी प्रारंभी प्रचंड आर्थिक गुंतवणूक करावी लागते. आणि विक्रीतून मिळणाऱ्या निधीतून त्यात सतत भर घालावी लागते.

मराठीच्या बाबतीत हे होत आहे का ?

मराठी भाषकांच्या ज्या अन्य भाषिक गरजा - कोशांच्या संदर्भातल्या - आहेत (उदाहरणार्थ, इंग्रजी-मराठी, मराठी-इंग्रजी, फ्रेंच/हिंदी, जर्मन/जपानी/चिनी/कन्नड/गुजराती/बंगाली/तमिळ/मल्याळम् इ०इ०) त्यांच्या बाबतीत हे होत आहे का ?

वाढलेल्या भाषिक व्यवहाराची दखल घेणारे कोश निर्माण झाले तर ते भाषेच्या वाढीमध्ये/विकासामध्ये महत्त्वाची भूमिका बजावू शकतात. अन्यथा कोश व भाषिक व्यवहार कुंठित होतात, गोठून जातात.

मराठीतील कोश कुंठितावस्थेत आहे. भाषाही त्या अवस्थेत जायला नको असेल जबाबदार मंडळींनी (पक्षी शासन, राज्य मराठी विकास संस्था, महामंडळ) तातडीने कोशनिर्मितीकडे वळायला हवे. ■

**प्र. ना. परांजपे**

# करुया त्याग नागरीचा ?

द. भि. कुलकर्णी

मराठी भाषेवर गंडान्तर आले आहे, असे रोज आपण एकमेकांना सांगत असतो; आपले हे भय खरेच असते. इंग्रजी माध्यमांच्या शाळांचे पीक, जागतिकीकरण व मुख्य म्हणजे आपली अस्मिताहीन मन:प्रवृत्ती हे या गंडान्तराचे कारण असावे.

पण आपल्यापैकी कितीजणांच्या हे लक्षात येते की मराठी भाषेवरच नव्हे; तर मराठीची लिपी - देवनागरी लिपी - तिच्यावरही मोठेच गंडान्तर आले आहे ?

ट्रकच्या मागील बाजूस 'आवाज दो' (AWAZ DO) असे रोमन लिपीत लिहिलेले आपण पाहिले; तेव्हा आपल्याला गंमत वाटली होती; यांना 'ऑल इंडिया परमिट' आहे, अनेक विभिन्न भाषक राज्यांतून या गाड्यांचा संचार होतो, ते रोमन लिपीचा अवलंब करणारच; एरव्ही बंगाली, दाक्षिणात्य ट्रक-चालकांना 'आवाज दो' ही देवनागरी सूचना कशी कळणार ? - आपण तेव्हा अशी स्वत:ची समजूत घातली होती; तेव्हा आपण असे काही म्हटले नाही की, भारतीय घटनेने सर्व भारतीय भाषांसाठी देवनागरीचा पुरस्कार केला आहे तर यांनाही त्याची आठवण करून द्यावी ! – आपण तेव्हा गप्प बसलो.

आता ही रोमन लिपी मराठी-हिंदी या भाषांच्या बोकांडी बसताना पाहूनही आपण गाफीलच आहोत : रूपवाणीवरच्या जाहिराती पाहा : 'Dil Mange Mor' आणि अशा अनेक; संचारी फोनवरही हे सुरू झाले आहे - एसएमएस

परभाषेतील शब्द आत्मसात करता येतात; हिंदी याबाबतीत अग्रेसर दिसते : ती 'बस' (Bus) हा इंग्रजी शब्द तरं घेतेच; पण आपल्यासारखे त्याचे अनेकवचन 'बसेस' असे करीत नाही; 'बसें' असे करते – हे खरे आत्मसातीकरण.

परभाषेतील शब्द आत्मसात करता येतात; त्यांना वेगळी अर्थच्छटाही देता येते; पण परलिपी आत्मसात करता येत नाही; ती आपल्या लिपीला खाऊन टाकते. सध्या रोमन लिपी देवनागरी लिपीला खात आहे आणि आपण गाफील आहोत.

मी स्वत: रोमन - नव्हे आंतरराष्ट्रीय - अंकांचा पुरस्कर्ता आहे; भारतीय राज्य घटनेचा तसा आदेशही आहे. नव्या पिढीमध्ये 1, 2, 3, 4 इत्यादी आंतरराष्ट्रीय अंक इतके रुजले आहेत की कूरियरवाला पोरगा म्हणाला, ''अंकल, यह आपने ''४४...'' क्या लिखा है, समझता नही ।'' बोला. ''अठ्ठावन्न' म्हटले की ही मुले '8-1'






असे लिहितात.

हे असेच चालू राहिले तर, लष्करात जवानांसाठी जशी रोमन लिपीतील हिंदी पुस्तके असतात तशी, ज्ञानेश्वरी-तुकोबांची गाथा-दासबोध ही पुस्तके रोमन लिपीत छापावी लागतील. मराठीसाठी रोमन लिपीचा स्वीकार करावा, असा प्रयोग मधुकर गोगटे यांनी केला होताच; सुदैवाने त्याचा त्यांनी लवकरच त्याग केला; आता त्यांनी पुरस्कार न करताही तो अमलात येत आहे.

भाषा आणि लिपी यांत परिवर्तन होत असते, हे खरे; पण रोमनीकरण हे परिवर्तन नव्हे, हे आक्रमण आहे - आणि आक्रमण थोपवावे लागते; ते आपोआप थांबत नाही.

आणखी एक मुद्दा : हिंदीचे पाहून पाहून मराठीचे प्रौढ विद्यार्थीही मराठी शब्दांतील शब्दयोगी अव्यय आणि विभक्तिप्रत्यय मूळ शब्दापासून दूर-तुटक लिहू लागले आहेत; जसे, 'मराठी भाषे चे', 'मराठी भाषे साठी' इत्यादी. गुजरातीच्या संपर्काने की काय आपण लेखी व्यवहारांत - छापील नव्हे - अक्षरांवरील शिरोरेखा घालविल्या आहेतच - महानुभाव लेखकांनी ते पूर्वीच अमलात आणले होते; विनोबांनीही प्रत्यय - शब्दयोगी अव्यव विभक्त लिहिण्याचा प्रयोग केला होता; पारंपरिक मराठी अंक गेले, शिरोरेखा गेल्या तसे एक दिवस अव्यय-प्रत्ययही विभक्त झाले तर नवल वाटावयास नको.

मराठीत इकार-उकार यांचे ऱ्हस्व-दीर्घ असे भेद नकोच असे काहीसे डॉ. वि. भि. कोलते यांनी म्हटल्याचे आठवते - ते अजून अमलात यायचे आहे; पण माझे अनेक संशोधक अधिछात्र, ऱ्हस्व-दीर्घाच्या चुका नकोत म्हणून 'मध्यम मार्ग' स्वीकारतात : ते उकार ु असा ऱ्हस्वही लिहीत नाहीत की ू असा दीर्घही लिहीत नाहीत; ते ॖ असा उभा मध्यम मार्गी उकार लिहितात - तुम्हांला जे समजायचे आहे ते समजा ! आहेत नं हे आधुनिक बिरबल ?

आपण जर असेच गाफील राहिलो तर एक दिवस, मोडी लिपीप्रमाणे, देवनागरी लिपीसुद्धा देवाप्रमाणे अंतर्धान पावेल - तसे होऊ द्यायचे की नाही, हे आताच आपण ठरवायला हवे; तसे झाले तर आपण केवळ भाषाविषयक व लिपीविषयक ज्ञानसातत्यच गमावून बसू असे नाही तर एकूणच सांस्कृतिक सातत्यालाच पारखे होऊ; ते चालेल ?

■

'आद्यायनी' जंतरमंतर अमरावती रोड, नागपूर - ४४००३३
दूरभाष (०७१२) २५३२३१७












# मराठी आणि रोमन लिपी

म.ना. गोगटे

मराठी भाषेसाठी देवनागरी हवीच आहे. गरज पडल्यास पर्यायी रोमन लिपी वापरावी, अशी सूचना कित्येक वर्षे मी मांडत आहे. गरजेनुसार लघुलिपी व ब्रेल लिपी यांचाही उपयोग होतो.

१९८४मध्ये मराठीच नव्हे तर सर्व भारतीय भाषांसाठी पर्यायी रोमन लिपी असावी, याचा प्रसार करण्यासाठी मी रोमन लिपी परिषद स्थापन केली. तिला काही प्रतिसाद मिळाला. परिषदेने काही प्रकाशने प्रसिद्ध केली. प्रारंभी भारतीय लिपींचे सॉफ्टवेअर उपलब्ध नव्हते, पण ते विकसित होत गेले व रोमन पर्याय लोकप्रिय नाही असे दिसले. ती संस्था १९९५मध्ये बंद झाली. 'रोमन लिपी परिषद पर्स्पेक्टिव्ह' हे पुस्तक १९९५मध्ये मी लिहिले आणि काही देशीविदेशी ग्रंथालयांना दिले. पुस्तकाची एक प्रत व संस्थेचे काही रेकॉर्ड संग्रहासाठी भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे यांच्याकडे नोव्हें. २००२मध्ये दिले.

१९९५पासून माहितीतंत्रज्ञानाचा वेगाने प्रसार होऊ लागला. इंग्रजी भाषा व सर्वत्र इंग्रजीचे कीबोर्ड व पसरत आहेत. छापखाने आहेतच, पण घरोघरी मुद्रक व मुद्रण आले. ठायीठायी (डिव्हिडंड वॉरंट, रेडियोवरील लेबले इत्यादी) इंग्रजीचा (व रोमनचा) स्वीकार बहुभाषी बहुलिपी भारताने केला. काही प्रमाणात देवनागरीत मुद्रण व ईमेल करता येतात, व ते ठीकच आहे. पण फॉन्ट, युनिकोड यांच्या काही समस्या आहेत. म्हणूनच हजारो लोकांनी मराठीसाठी रोमन लिपी ईमेलपुरती स्वीकारली आहे. कित्येक व्यापारी रोमनमध्ये मराठी यांत्रिक पावत्या देतात. मात्र रोमन लिपीचा वापर सुसूत्र होत नाही. उदा० (आ) या ध्वनीसाठी (a) (aa) (A) (a') अशी विविधता आहे.

मराठी भाषेचा रोमन आविष्कार या माझ्या लेखास दैनिक लोकसत्ता, किर्लोस्कर मासिक व अमेरिकेतील बृहन्महाराष्ट्र वृत्त यांनी ऑगस्ट-डिसेंबर २००३ काळात प्रसिद्धी दिली. देवनागरीत गुण आहेत. तिच्यात लेखन संक्षिप्त होते. उदा. 'प्रेम' हा दोन अक्षरी शब्द रोमन लिपीत prem असा चार अक्षरी पसरतो. देवनागरी बरीचशी ध्वनीअनुसारी आहे. पण ती फोनबुकांस सोयीची नाही. देवनागरी वर्णक्रमीच्या डायऱ्या मिळत नाहीत. सर्वजण रोमन वर्णक्रमी वापरतात. देवनागरी अंकांचे कॅलक्युलेटर नाहीत. माहितीयुगासाठी एकस्तरी रोमन लिपी इष्ट आहे. चिन्ह व ध्वनी यांचे प्रमाण








संकेत ठरवले पाहिजेत. इंग्रजी यंत्रात उपलब्ध असलेलीच चिन्हे निवडावीत. लिप्यंतरण करण्याऐवजी ध्वनीनुसार लेखन करावे. उदा० सरकार हा शब्द sarakaara ऐवजी sarkaar असा लिहावा. (अभ्यासकांनी www.mngogate.com या वेबसाईटवर E03, E04, M11, M12 लेख पहावेत.) ■

४ पवन अपार्टमेंट, लक्ष्मी पार्क, नवी पेठ, पुणे ४११०३० फोन २४३३७५७४





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद

# भाषेच्या अभ्यासाची नवी क्षितिजे

**नोम चॉम्स्की**
भाषांतर : **मिलिंद मालशे**

(नोम चॉम्स्की यांचा मूळ लेख 'न्यू होरायझन्ज् इन् द स्टडी ऑफ लँग्विज अँड माइंड' या केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेसने इसवी सन २०००मध्ये प्रकाशित केलेल्या पुस्तकात प्रकरण १ म्हणून समाविष्ट आहे. पृष्ठे ३ ते १८)

*[ **भाषांतरकर्त्याचे प्रास्ताविक :** ''भाषेच्या अभ्यासाची नवी क्षितिजे'' हा निबंध भाषा, मन आणि वैज्ञानिक अभ्यास या तीन संकल्पनांविषयी नवी मांडणी करणारा निबंध आहे. भाषा आणि व्याकरण यांविषयी एक आकारिक सिद्धांत मांडायला नोम चॉम्स्की यांनी १९५०नंतर प्रारंभ केला. (सिंटॅक्टिक स्ट्रक्चर्स, १९५७) या सिद्धांतामुळे भाषाविज्ञानाचे एकूण स्वरूप आमूलाग्र बदलून गेले. भाषेचा अभ्यास म्हणजे भाषेच्या बाह्य सामाजिक - सांस्कृतिक परिसराचा अभ्यास असे न मानता मानवी मनामध्ये विकसित होणाऱ्या भाषिक ज्ञानाचा म्हणजेच भाषिक क्षमतेचा अभ्यास असे चॉम्स्की यांनी मानले, आणि मनोविज्ञान व जीवविज्ञान यांच्या अंगाने हा अभ्यास विकसित केला. मानवजातीला भाषा आत्मसात करण्याची एक जैविक यंत्रणा, म्हणजेच भाषाशक्ती, जन्मत: प्राप्त झालेली असते, व प्रत्यक्ष भाषिक व्यवहाराचा अनुभव व संदर्भ मिळाला की ही यंत्रणा कार्यरत होऊन आपल्या मनात भाषा विकसित होते, हे या भूमिकेमागील मुख्य प्रमेय आहे. भाषेचे मूलघटक सुटे सुटे व संख्येने अगदी मर्यादित असतात; मात्र त्यांची विशिष्ट तत्त्वांनुसार जुळणी वा संगणन होऊन लांबीने व संख्येने अपरिमित अशा रचना त्यांमधून निर्माण होतात. मानवी मनामध्ये भाषिक ज्ञानाची जी आरंभिक स्थिती असते ती या स्वरूपाची असते. प्रत्यक्ष भाषिक व्यवहाराचा अनुभव मिळू लागला की या आरंभिक स्थितीमध्ये परिवर्तने घडून विकसित अशी भाषा मनात निर्माण होते. इतर व्यक्ती ज्या नव्या रचना करतात त्यांचे आकलन होणे व स्वत:ला नव्या व अपरिमित रचना निर्माण करता येणे, हे या विकसित भाषिक क्षमतेमुळे शक्य होते. भाषिक अनुभव अगदी अपुरा, खंडित स्वरूपाचा असूनही मनात विकसित होणारे ज्ञान मात्र अतिशय समृद्ध व परिपूर्ण असते, कारण हे ज्ञान विशिष्ट प्रकारच्या जैविक घडणीमुळे प्राप्त झालेले असते. या दृष्टीने पाहता भाषा हा एक मानवी अवयवच मानायला हवा, असे चॉम्स्की यांचे म्हणणे आहे.*

*गॅलिलिओ आणि देकार्त यांनी विज्ञान व तत्त्वज्ञान या क्षेत्रांमध्ये जी ज्ञानात्मक*








*क्रांती १७व्या शतकात घडवून आणली तिच्यामागील काही महत्त्वाच्या तत्त्वांचा मागोवा चॉम्स्की घेऊ पाहतात आणि १९५०च्या दशकात भाषेच्या अभ्यासात हीच तत्त्वे केंद्रस्थानी होती हे दाखवून देतात. ''परिमित साधनांचा अपरिमित उपयोग'' हे या संदर्भातील महत्त्वाचे तत्त्व ठरते. भाषेमध्ये मूलभूत घटक (उदा० ध्वनी) हे संख्येने मोजकेच असतात, म्हणजेच परिमित असतात; मात्र त्यांचा वापर करून निर्माण झालेल्या रचना अक्षरशः अगणित असतात. या अगणित रचना कोणत्या नियमांवर आधारलेल्या असतात याची सुस्पष्ट मांडणी म्हणजेच भाषेचे व्याकरण होय. चॉम्स्की याला निर्देशनात्म व्याकरण म्हणतात; कारण त्यातून रचनांचे सुस्पष्ट गणन वा निर्देशन (जनरेशन) होत असते.*

*मानवी भाषा या व्यामिश्र आणि बहुविध स्वरूपाच्याही असतात. शब्दांची रचना, वाक्यांची घडण इत्यादी बाबतींमध्ये गुंतागुंतही असते आणि बहुविधताही असते. या संदभार्त चॉम्स्की अशी भूमिका घेतात की गुंतागुंत आणि बहुविधता हे भाषेचे गुणधर्म पृष्ठस्तरावरचे गुणधर्म होत. सखोल पातळीवर भाषेची काही सार्वत्रिक वा सामान्य मूलतत्त्वे असतात आणि त्याचबरोबर या सामान्य मूलतत्त्वांवर प्रक्रिया घडवून बहुविधता निर्माण करणारी उपतत्त्वेसुद्धा असतात. या दोन्ही प्रकारच्या तत्त्वांचा शोध घेणे, हे भाषेच्या वैज्ञानिक संशोधनाचे मुख्य उद्दिष्ट ठरते.*

*भाषा म्हणजे ध्वनिघटक व अर्थघटक यांची जुळणी करणारी एक व्यवस्था असते, या स्वरूपाचा विचार फेर्दिना द सोस्यूर (१८५७-१९१३) या भाषाभ्यासकाने विसाव्या शतकाच्या प्रारंभीच मांडला होता. परंतु ही जुळणी यादृच्छिक असते व त्यातून अर्थातच भाषांची बहुविधता निर्माण होते. चॉम्स्की यांना यादृच्छिकता व बहुविधता यांपेक्षा सर्व भाषांना समान असणाऱ्या जुळणीच्या तत्त्वांचा शोध घ्यायचा आहे. १९९५ पासून त्यांनी जो ''लघुतमवादी प्रकल्प'' मांडलेला आहे त्यात त्यांनी अशा कमीत कमी सार्वत्रिक तत्त्वांचा शोध घेण्यावर भर दिलेला आहे. मूलघटकांना विकार होऊन त्यांची विविध रूपे बनणे आणि मूलघटकांचे स्थानांतरण होणे, ही तत्त्वे त्यांच्या या नव्या प्रकल्पामध्ये सार्वत्रिक मूलतत्त्वे ठरलेली आहेत.*

*मानवी भाषा हा मानवी मनाचा वा मेंदूचा एक अवयव असतो, परंतु तो एकमेव मात्र नसतो. मानवी मनाच्या घडणीमध्ये इतर प्रक्रियाही चालू असतात. या भाषेत प्रक्रियांचा भाषिक घडणीशी काय संबंध असतो, याविषयीही चॉम्स्की यांनी काही चिंतन मांडले आहे. मानवी मनामध्ये संकल्पना विकसित होत असतात; त्यांचा संबंध भाषेच्या अर्थघटकांशी व त्यांच्या जुळणीशी असतो. दुसऱ्या बाजूला तोंडामधून होणारे उच्चारण व कानाने होणारे श्रवण या प्रक्रियांचा संबंध भाषेच्या ध्वनिघटकांशी व त्यांच्या जुळणीशी असतो. या संदर्भात चॉम्स्की यांनी काढलेला सैद्धांतिक निष्कर्ष हा खूप*

*मोठ्या पुराव्यावर आधारलेला नसला तरी पुढील संशोधनाला चालना देणारा आहे. हा निष्कर्ष असा की मनाच्या इतर प्रक्रियांसाठी योग्य वा आकलनीय ठराव्या अशाच रचना भाषेमध्ये असतात; म्हणजेच मनाच्या एकूण घडणीचा विचार करता भाषिक व्यवस्था ही 'परिपूर्णते'च्या खूपच जवळ जाणारी व्यवस्था असते.]*

भाषेचा अभ्यास ही शास्त्रीय अभ्यासाच्या शाखांपैकी एक अत्यंत प्राचीन शाखा आहे. तिचा प्रारंभ भारत आणि ग्रीस या अभिजातकालीन संस्कृतींमध्ये झाला आणि या अभ्यासाची ऐतिहासिक परंपरा समृद्ध आणि फलदायी अशीच आहे. आजच्या प्रमुख भाषाभ्यास प्रकल्पाला फक्त चाळीस वर्षांचा इतिहास आहे; या प्रकल्पाचा प्रारंभ पारंपरिक अभ्यासातील काही मूलभूत कल्पनांचे पुनरुज्जीवीकरण व पुनर्मांडणी करून झाला. व त्यातून संशोधनाला एक अत्यंत फलदायी दिशा मिळाली आहे, हे आता सिद्ध झाले आहे.

भाषेविषयी [मानवाला] इतका प्रदीर्घ काळ आकर्षण वाटावे, यात काही आश्चर्य नाही. मानवाची भाषाशक्ती ही खरोखरीच ''जीवजातीचे लक्षण'' ठरेल अशीच शक्ती असलेली दिसते : मानव या जीवजातीमध्ये ती सारख्याच स्वरूपाची असते तर इतर जीवजातीमध्ये तिचा आढळ होत नाही. भाषेसारखी एखादी शक्ती कीटक या जीवजातीत आढळते, असे कदाचित म्हणता येईल, परंतु त्यांच्यात व मानवात उत्क्रांतीच्या दृष्टीने शंभर कोटी [एक बिलियन किंवा १०००,०००,०००] वर्षांचे अंतर आहे. ''मानव आणि [इतर] प्राणी यांच्यात वास्तविक भेद'' म्हणजे भाषिक चिन्हांचा वापर करण्याची शक्ती मानवापाशीच असते, या देकार्त-प्रणीत[१] दृष्टिकोणाला आव्हान द्यायला आज तरी काहीच कारण दिसत नाही. मानव आणि ''यंत्र'' यांतही असाच भेद करता येईल - येथे ''यंत्र'' म्हणजे १७ व्या व १८ व्या शतकांत लक्ष वेधून घेणारी स्वयंचलित यंत्रे असोत किंवा आज विचार व कल्पनाशक्तीला प्रेरित करणारी यंत्रे असोत.

शिवाय भाषाशक्ती ही मानवी जीवन, विचार व मानवांमधील परस्पर प्रक्रिया यांच्या प्रत्येक पैलूशी निगडित असणारी शक्ती आहे. व्यामिश्र व समृद्ध अशी सांस्कृतिक उत्क्रांती आणि सांस्कृतिक वैविध्य सजीव विश्वामध्ये फक्त मानवापाशीच आहे, व याला प्रामुख्याने भाषाशक्तीच कारणीभूत आहे; आणि मानवाचे जैविक यश म्हणजे तांत्रिक [जीवशास्त्राच्या] दृष्टीने विचार करता मानवांची संख्या खूप मोठी असणे, यामागेही भाषाशक्तीच आहे. मंगळावरचा एखादा वैज्ञानिक पृथ्वीवरच्या अनोख्या जगात काय चालले आहे याचे निरीक्षण करीत असेल तर [मानवी] बौद्धिक संरचनेच्या या अनन्य अशा आविष्काराचा (म्हणजेच भाषाशक्तीचा) उगम आणि

त्याचे महत्त्व, या गोष्टींनी तो स्तिमित झाल्याशिवाय राहणार नाही. मानवजात ही स्वत:चा स्वभाव समजून घेऊ पाहते आणि व्यापक विश्वामध्ये स्वत:चे स्थान काय हेही समजून घेऊ पाहते; या प्रक्रियेत भाषा व तिच्याशी संबंधित असे कूटप्रश्न यांनाही स्थान असावे, हे स्वाभाविकच म्हटले पाहिजे.

मानवी भाषा ही एका प्राथमिक स्वरूपाच्या गुणधर्मावर आधारलेली आहे, आणि हा गुणधर्म जैविकदृष्ट्या [खास मानवाचा असा] अनन्य गुणधर्म असावा असे दिसते : हा गुणधर्म म्हणजे सुट्या घटकांची अपरिमितता (डिस्क्रीट इन्फिनिटि) होय. स्वाभाविक संख्यांमध्ये (नॅचरल नंबर्ज) म्हणजे १, २, ३... यांमध्ये हा गुणधर्म निखळ स्वरूपात आढळतो. बालकांना हा गुणधर्म शिकावा लागत नाही; मनामध्ये यामागील मूलभूत तत्त्वे आधीच अस्तित्वात असल्याशिवाय कितीही पुरावा दिला तरी त्यातून या संख्या हाती लागणार नाहीत. त्याचप्रमाणे तीन आणि चार शब्दांची वाक्ये असतात, परंतु साडे-तीन शब्दांची वाक्ये असू शकत नाहीत. आणि वाक्ये तयार करताना त्यात तीन-चार-पाच... असे अपरिमित शब्द असू शकतात - ही तत्त्वे कोणत्याही बालकाला शिकावी लागत नाहीत. विशिष्ट आकार (फॉर्म) व विशिष्ट अर्थ (मीनिंग); असणारे अधिक व्यामिश्र स्वरूपाचे वाक्य कधीही निर्माण करता येणे [बालकाला] शक्य असते. डेविड ह्यूम[२] याच्या शब्दांत सांगायचे तर या प्रकारचे ज्ञान आपल्याला प्राप्त होते ते ''मूळ निसर्गामधून'' प्राप्त होते (1748/1975 : 108, section 85) आपल्याला लाभलेली ती एक जैविक देणगी असते.

या गुणधर्मामुळे गॅलिलिओ[३] चक्रावून गेला, [कारण] आपल्या अत्यंत खासगी विचारांना छोट्याशा २४ अक्षरांद्वारे दुसऱ्या व्यक्तीपर्यंत पोहोचविणाऱ्या माध्यमाचा शोध हा मानवाने लावलेल्या शोधांपैकी सर्वश्रेष्ठ होय, अशी त्याची धारणा होती (Galileo 1632/1661, end of first day) सुट्या घटकांची अपरिमितता भाषेच्या गुणधर्माचे प्रतिरूपण करण्यासाठीच ही अक्षरे [लिपी] वापरली जातात, व त्यामुळेच हा शोध यशस्वी ठरलेला आहे. गॅलिलिओनंतर लगेचच पोर्ट रॉयल व्याकरणाच्या[४] लेखकांना डझन-दोन डझन ध्वनींमधून अपरिमित प्रयोगांची रचना करून त्यांच्याद्वारे आपले विचार, कल्पना आणि भावना इतरांपर्यंत पोहोचविणाऱ्या या माध्यमाचा ''अफलातून शोध'' लक्षणीय वाटला. आधुनिक दृष्टीने पाहता हा ''शोध'' नव्हता, हे खरे; परंतु जैविक उत्क्रांतीची एक निष्पत्ती म्हणून ही गोष्ट ''अफलातून'' मात्र होती, आणि या संदर्भात या जैविक उत्क्रांतीशिवाय आपल्याला जवळजवळ काहीच ज्ञान नाही.

भाषाशक्ती ही [शरीराचा] एक ''भाषिक अवयव'' असते, असे मानणे फारसे चूक ठरणार नाही. ''दृष्टीव्यवस्था'', ''संसर्गसंरक्षक व्यवस्था'' किंवा ''अभिसरण

व्यवस्था'' यांना वैज्ञानिक जसे शरीराचे अवयव मानतात, त्याच धर्तीवर भाषेला एक शारीरिक अवयव मानता येईल. येथे एखादा अवयव हा इतर सर्व अवयव तसेच ठेवून शरीरातून काढून घेता येत नाही, असे अभिप्रेत आहे. भाषिक व्यवस्था ही शरीराचीच एक उपव्यवस्था असते, मात्र [इतर शारीर व्यवस्थांपेक्षा] ती अधिक गुंतागुंतीची असते, इकतेच. भाषिक व्यवस्थेच्या विविध घटकांचे खास स्वत:चे गुणधर्म आणि त्यांच्या परस्परप्रक्रिया यांचे संशोधन करून या व्यवस्थेची गुंतागुंत पूर्णपणे आकलन करून घेणे हे आपले उद्दिष्ट आहे. भाषाशक्तीचे संशोधन या पद्धतीने चाललेले आहे.

याशिवाय आपण असेही गृहीत धरणार आहोत की भाषिक अवयव हा इतर अवयवांप्रमाणेच मूलत: जनुकांना (जीन्ज)[५] आविष्कार असतो. हे नेमके कसे होते, हे समजण्यासाठी या संशोधनाला बराच वेळ लागेल हे खरे असले तरी जैविकदृष्ट्या निर्धारित असणारी भाषेची जी ''आरंभिक स्थिती'' असते तिचे संशोधन वेगळ्या मार्गांनी करता येते. प्रत्येक भाषा ही दोन घटकांच्या परस्परप्रक्रियेचा परिपाक असते. एक घटक म्हणजे आरंभिक स्थिती आणि दुसरा म्हणजे अनुभवाचा गतिक्रम (कोर्स ऑफ एक्स्पिरियन्ज) [भाषेची] आरंभिक स्थिती ही एक ''भाषासंपादनयंत्रणा'' असते असे मानता येईल; या यंत्रणेत अनुभव हा ''देयघटक'' (इन्पुट) असतो तर भाषा ही ''निष्पन्नघटक''(आऊटपुट) असते. या निष्पन्नघटकांचे मनाच्या/मेंदूच्या अंतर्गत प्रतिरूपण झालेले असते. देयघटक आणि निष्पन्नघटक या दोहोंचे परीक्षण शक्य असते : अनुभवाच्या गतिक्रमाचे त्याचप्रमाणे भाषेच्या गुणधर्मांचे संशोधन करता येते. या दोहोंच्या संशोधनातून जी मर्मदृष्टी हाती लागेल तिच्यामुळे या दोहोंच्या मध्यस्थानी असणारी जी आरंभिक स्थिती आहे तिच्याविषयी बरेच ज्ञान मिळू शकेल.

शिवाय, आरंभिक स्थिती ही संपूर्ण मानवजातीमध्ये सारख्याच रूपात आढळते असे मानायला सबळ पुरावा आहे : माझी मुले या प्रक्रियेमध्ये [जपानमध्ये] लहानाची मोठी झाली असतील तर तेथील इतर मुलांप्रमाणेच ती जपानी बोलतील.[६] याचा अर्थ असा की जपानीविषयीचा जो काही पुरावा मिळेल तो इंग्लिशच्या आरंभिक स्थितीवर प्रकाश टाकणाराच असेल. यासारख्या संशोधनपद्धती वापरून आरंभिक स्थितीच्या सिद्धांताने कोणत्या अटीची पूर्तता अपरिहार्यपणे करायला हवी याबद्दलच्या तीव्र स्वरूपाच्या अनुभवनिष्ठ अटी प्रस्थापित करता येतात. त्याचप्रमाणे या संशोधनातून भाषेच्या जीववैज्ञानिक अभ्यासासाठी अनेक समस्याही उभ्या करता येतात : जनुकांमुळे आरंभिक स्थिती कशी निर्धारित होते ? आरंभिक स्थिती आणि त्यानंतर विकसित होणाऱ्या स्थिती यामध्ये मेंदूच्या कोणत्या यंत्रणा गुंतलेल्या असतात ? [भाषेपेक्षा] बऱ्याच कमी गुंतागुंतीच्या व्यवस्था घेतल्या तर प्रत्यक्ष अनुभव शक्य असतो, आणि तरी त्यांच्याही संदर्भात या समस्या अत्यंत अवघड आहेत; परंतु यातील काही समस्या

संशोधनाच्या क्षितिजावरच्याही असू शकतील.

मी आता ज्याची रूपरेषा मांडतो आहे तो संशोधनप्रकल्प भाषाशक्तीविषयीचा आहे : या शक्तीची आरंभिक स्थिती आणि त्यानंतर तिच्या विकसित होणाऱ्या स्थिती याबद्दलचा तो आहे. असे समजा की पीटर या व्यक्तीच्या भाषिक अवयवाची अवस्था ''भ'' ही आहे. [म्हणजेच] ''भ'' ही पीटरने ''आत्मसात केलेली अंतर्गत भाषा'' आहे. मी जेव्हा भाषा या संकल्पनेचा उल्लेख येथे करतो तेव्हा मला ही भाषा अभिप्रेत आहे. या दृष्टीने पाहता भाषा म्हणजे ''आपण बोलतो व समजून घेतो त्याची एक पद्धत'' असे काहीसे म्हणता येईल; आणि ही भाषेविषयीची पारंपरिक संकल्पना आहे.

आता आपण [''व्याकरण'' ही] आणखी एक पारंपरिक संज्ञा घेऊ, पण तिचा वापर मात्र नव्या संदर्भ - चौकटीमध्ये करू : पीटरच्या भाषेचा सिद्धांत म्हणजे त्याच्या भाषेचे ''व्याकरण'' असते, असे आपण म्हणू. पीटरच्या भाषेतून अपरिमित/असंख्य अभिव्यक्ती निर्धारित होतात, व यातील प्रत्येक प्रयोगाला ध्वनिरूप असते व अर्थरूप असते. तांत्रिक परिभाषा वापरायची तर पीटरच्या भाषेतून त्याच्या भाषेचे प्रयोग ''निर्देशित'' (जनरेट [म्हणजे नियमांनुसार निश्चित]) होत असतात. त्यामुळे त्याच्या भाषेच्या सिद्धांताला निर्देशनात्मक व्याकरण[७] म्हणतात. प्रत्येक प्रयोग हा गुणधर्माची एक व्यामिश्र व्यवस्था असतो, आणि त्यातून पीटरच्या प्रयोगव्यवस्थेला ''सूचना'' पुरवीत असतो : त्याची वागींद्रियांची यंत्रणा, विचारांची व्यवस्था लावण्याची व्यवस्था, इत्यादी [या प्रयोगात्म व्यवस्थेत समाविष्ट असतात.] आपली भाषा आणि तिच्याशी संबंधित असणाऱ्या प्रयोगव्यवस्था या सुस्थितीत असल्या तर भाषिक प्रयोगांचे ध्वनिरूप व अर्थरूप यांच्याविषयी पीटरपाशी ज्ञानाचा एक प्रचंड साठा असतो, आणि त्याचबरोबर तो जे ऐकतो त्याचे अर्थविवरण करण्याची, आपल्या विचारांची अभिव्यक्ती करण्याची आणि इतर अनेक वेगवेगळ्या पद्धतीनी आपल्या भाषेचा वापर करण्याची कुवतही पीटरपाशी असते. [असे म्हणायला हवे].

१९५०च्या दशकात जी ''ज्ञानात्मक क्रांती''[८] घडून आली असे म्हटले जाते तिच्या संदर्भात निर्देशनात्मक व्याकरणाचा उदय झाला, आणि या क्रांतीला चालना देणारा तो एक महत्त्वाचा घटक होता. ''क्रांती' ही संज्ञा सुयोग्य असो वा नसो; त्या वेळी भूमिकेमध्ये एक महत्त्वाचा बदल घडून येत होता : वर्तन आणि त्यातून निष्पन्न होणाऱ्या गोष्टी (उदाहरणार्थ, संहिता) यांच्यावर असणारा भर कमी होऊन विचार आणि कृती यांमध्ये कार्यरत असणाऱ्या अंतर्गत यंत्रणावर भर दिला जाऊ लागला. वर्तन व त्यातून निष्पन्न होणाऱ्या गोष्टी या संशोधनाचे साध्य नसून त्या पुरावा-सामग्री ठरतात; त्यांच्यामधून मनाच्या अंतर्गत यंत्रणांविषयी आणि कृती करताना व अनुभवाचा अर्थ लावताना या यंत्रणा कोणत्याप्रकारे कार्यरत होतात

याविषयीचे पुरावे मिळू शकतात, असा दृष्टिकोण ज्ञानात्मकतावादी भूमिकेतून निर्माण झाला. [अमेरिकन] संरचनावादी भाषाविज्ञानामध्ये[९] गुणधर्म आणि रचना यांवर भर होता; नव्या (ज्ञानात्मकतावादी) भूमिकेत यांना जागा होती, परंतु इतर अनेकानेक घटितांप्रमाणेच यांचेही स्पष्टीकरण प्रयोगांना निर्देशित करणाऱ्या यंत्रणांच्या परिभाषेत देता यायला हवे, यादृष्टीनेच त्यांच्याकडे पाहिले गेले. ही भूमिका ''मानसवादी''/ ''मनोवादी'' (mentalistic) म्हणता येईल. मात्र हा वादाचा मुद्दा ठरू नये. ही भूमिका ''विश्वाच्या मानसिक पैलूं''शी संबंधित आहे, आणि हे मानसिक पैलू विश्वाच्या यांत्रिक, रासायनिक, दृश्य व इतर पैलूंप्रमाणेच असतात [हे ध्यानात घ्यायला हवे]. नैसर्गिक विश्वातील एक खऱ्याखुऱ्या वस्तूचा अभ्यास करू पाहणारी ही भूमिका आहे - ही वस्तू म्हणजे मेंदू, त्याच्या स्थिती व त्याची कार्ये होत. अशा प्रकारे ज्ञानात्मकतावादी भूमिकेमुळे मनाचे संशोधन हे अखेरीस जैविक विज्ञानांशी एकरूप होण्याच्या दिशेने विकसित होते.

सतराव्या आणि अठराव्या शतकांमध्ये जी वैज्ञानिक क्रांती घडून आली तिच्यामुळे आपले विश्वाविषयीचे ज्ञान पूर्णपणे बदलून गेले. या व्यापक क्रांतीचा भाग म्हणजे या काळात घडून आलेली ''पहिली ज्ञानात्मक क्रांती'' असे म्हणता येईल. या पहिल्या ज्ञानात्मक क्रांतीमधून हाती लागलेली मर्मदृष्टी, ज्ञान तसेच तिच्यासमोर असणाऱ्या अडचणी यांची पुनर्मांडणी (१९५०च्या दशकात झालेल्या ''दुसऱ्या'') ''ज्ञानात्मक क्रांतीने केली. विल्हेम वॉन हुम्बोल्ट[१०] याचे शब्द वापरून बोलायचे तर भाषेमध्ये ''परिमित साधनांचा अपरिमित उपयोग'' केलेला असतो, हे १७व्या १८व्या शतकात माहीत झाले होते; परंतु मूळ कल्पना अस्पष्ट व धूसर राहिल्यामुळे या मर्मदृष्टीचा विकास एका मर्यादेपर्यंतच होऊ शकला. २०व्या शतकाच्या मध्यापर्यंत मात्र आकारिक विज्ञानांच्या[११] विकासातून आवश्यक त्या संकल्पना अत्यंत सुस्पष्ट स्वरूपात मिळाल्या होत्या, व त्यामुळे एखाद्या भाषेच्या प्रयोगाचे निर्देशन करणाऱ्या संगणकीय तत्त्वांचे अत्यंत नेमके स्पष्टीकरण देणे शक्य झाले; आणि त्यामुळेच ''परिमित साधनांचा अपरिमित उपयोग'' या कल्पनेचे स्पष्टीकरण देणे निदान अंशत: तरी शक्य झाले. इतर ज्ञानशाखांच्या विकासामुळे पारंपरिक प्रश्नांचे संशोधन करून त्यांची उत्तरे शोधण्यात अधिक यश मिळण्याचा मार्ग सुकर झाला होता. भाषिक परिवर्तनाच्या अभ्यासातून काही चांगल्या मर्मदृष्टी मिळाल्या होत्या. भाषेचे स्वरूप आणि विविधता यांच्याविषयी एक समृद्ध असे ज्ञान मानववंशवैज्ञानिक भाषाविज्ञानातून मिळाले होते व त्यामुळे भाषेविषयीच्या काही साचेबंद कल्पनांना छेदही मिळाला होता. त्याचप्रमाणे विसाव्या शतकातील संरचनावादी भाषाविज्ञानामुळे स्वनव्यवस्थेसारख्या काही विषयांच्या अभ्यासात बरीच प्रगती झालेली होती.



अनुक्रमणिका

निर्देशनात्मक व्याकरणाचा प्रकल्प प्रत्यक्षात आणताना प्रारंभीच असे लक्षात आले की ज्यांचा भरपूर अभ्यास झाला आहे अशा भाषांच्या बाबतीतसुद्धा [काही] प्राथमिक गुणधर्म अभ्यासकांच्या लक्षातच आलेले नाहीत, त्याचप्रमाणे अत्यंत व्यापक स्वरूपाची पारंपरिक व्याकरणे व शब्दकोश यांमध्ये भाषेच्या केवळ पृष्ठभागाला स्पर्श झालेला आहे. [या पारंपरिक अभ्यासाने] भाषांचे मूलभूत गुणधर्म पूर्णपणे गृहीत धरलेले असतात, व त्यामुळे ते दुर्लक्षित राहतात व त्यांची मांडणीही होत नाही. आपले उद्दिष्ट जर द्वितीय भाषा[१२] शिकण्यासाठी लोकांना मदत करणे, हे असेल, किंवा भाषांभाषांमध्ये कोणते भेद असतात याची एक सर्वसामान्य कल्पना आपल्याला हवी असेल, तर ही परिस्थिती योग्यच म्हणायला हवी [कारण या उद्दिष्टांमध्ये भाषेची वैज्ञानिक संकल्पना गृहीत धरलेली नसते.] परंतु भाषाशक्ती व तिच्या विविध स्थिती यांचे ज्ञान मिळविणे हे जर आपले उद्दिष्ट असेल तर ''वाचकाची बुद्धी'' ही गोष्ट गृहीत धरून चालणार नाही; तिला संशोधनाचे लक्ष्य बनवावे लागेल.

भाषासंपादन [किंवा भाषेचे आत्मसातीकरण] या गोष्टीच्या अभ्यासामधूनही हाच निष्कर्ष निघतो. भाषिक प्रयोगांचे अर्थविवरण कसे होते याकडे काळजीपूर्वक लक्ष दिले तर लगेच असे दिसून येईल की अगदी जन्मकाळापासून बालकाला अनुभवातून जे ज्ञान मिळते त्यापेक्षा कितीतरी अधिक ज्ञान त्याला प्राप्त झालेले असते. अगदी सोप्या शब्दांच्या बाबतीतही हे [तत्त्व] लागू पडते. बालकाची भाषिक वाढ सर्वाधिक गतीने होण्याचा जो काळ असतो[१३] त्या काळात प्रत्येक तासाला एक नवा शब्द या गतीने आत्मसातीकरण होत असते, आणि या प्रक्रियेच्या वेळी भाषिक अनुभव त्यामानाने फारच मर्यादित असतो आणि भाषिक परिसरही फारसा नीटनेटका नसतो. ज्या तरल आणि व्यामिश्र पद्धतीने शब्दांचे आत्मसातीकरण या काळात चालू असते त्याला कोणत्याही शब्दकोशांत तोड सापडत नाही, आणि या आत्मसातीकरणाच्या प्रक्रियेचे संशोधन आता कोठे सुरू झाले आहे. सुट्या शब्दांची पातळी आपण सोडली की आपला निष्कर्ष अधिकच नाट्यमय ठरू लागतो. भाषासंपादनाची [वा भाषेच्या आत्मसातीकरणाची] प्रक्रिया साधारणपणे अवयवांच्या वाढीच्या प्रक्रियेसारखीच असलेली आढळते; ही प्रक्रिया बालकांमध्ये [आपोआप] घडून येते, बालकाला त्यासाठी काही करावे लागत नाही. या प्रक्रियेत अर्थातच परिसराचा भाग असतो; परंतु सर्वसामान्य (भाषिक) वाढ आणि त्यातून निर्माण होणाऱ्या भाषेचे मूलभूत गुणधर्म हे आरंभिक स्थितीमुळे पूर्वनिश्चित झालेले असतात. आणि आरंभिक स्थिती ही तर मानवाला [निसर्गतः] लाभलेला [जैविक] ठेवा आहे. तेव्हा यातून असा निष्कर्ष निघतो की अंगभूत गुणधर्म आणि अगदी बारीक-सारीक तपशील यांच्या बाबतीत सर्व मानवी भाषा एकाच साच्याच्या असतात. मानवापाशी एकच भाषा आहे आणि तिच्या फक्त

परिघावरच बदल होतात, असा निष्कर्ष मंगळावरच्या भाषावैज्ञानिकाने काढला तर वावगे ठरणार नाही.

निर्देशनात्मक व्याकरणाच्या दृष्टिकोणातून भाषांचे अधिक काळजीपूर्वक संशोधन व्हायला लागल्यावर दोन गोष्टी लक्षात आल्या : एक म्हणजे [पारंपरिक अभ्यासात] त्यांची व्यामिश्रता आणि त्यांची विविधता या दोहोंना फारच कमी महत्त्व मिळालेले आहे. दुसरे म्हणजे भाषाशक्तीच्या आरंभिक स्थितीमुळे भाषांचे निर्धारण होत असते, हेही लक्षात आले. त्याच बरोबर विविधता आणि व्यामिश्रता या केवळ वरवर दिसणाऱ्या गोष्टी असतात, हे आपल्याला माहीतच आहे.

हे निष्कर्ष आश्चर्यकारक होते; ते परस्परविसंगत होतेच पण त्यांना नाकारता येणेही शक्य नव्हते. आधुनिक भाषाभ्यासामध्ये केंद्रवर्ती स्वरूपाचा ठरलेला जो प्रश्न आहे तो या निष्कर्षामधून उघडपणे पुढे येतो. हा प्रश्न म्हणजे सर्व भाषा या मूलतः एकाच सूत्राची परिवर्तने असतात, हे आपल्याला कसे सिद्ध करता येईल, आणि त्याचवेळी या वरवर पाहता भिन्न असणाऱ्या ध्वनी व अर्थ यासंबंधीच्या त्यांच्या व्यामिश्र अशा गुणधर्मांची यथातथ्य नोंद आपल्याला कशी घेता येईल ? मानवी भाषेसंबंधीच्या अस्सल सिद्धांताला दोन शर्ती पूर्ण कराव्या लागतील : ''वर्णनात्मक पर्याप्तता'' आणि ''स्पष्टीकरणात्मक पर्याप्तता''. एखाद्या विशिष्ट भाषेच्या गुणधर्मांचे, म्हणजेच त्या भाषेच्या भाषकापाशी असणाऱ्या ज्ञानाचे संपूर्ण व अचूक वर्णन जेव्हा एखादे व्याकरण देते तेव्हा त्या व्याकरणाने वर्णनात्मक पर्याप्ततेची अट पूर्ण केली आहे, असे म्हणता येते. [त्याही पुढे जाऊन] एका सामान्य [म्हणजे सर्व भाषांना सारख्या असणाऱ्या] आरंभिक स्थितीपासून सुरू करून अनुभवाच्या ''चरम शर्ती'' (बाउंडरी कंडिशन्ज)ची पूर्तता करून त्यापासून प्रत्येक भाषा कशी सिद्ध होते, हे दाखविता आले तरच स्पष्टीकरणात्मक अट पूर्ण झाली असे म्हणता येते. अशा पद्धतीने भाषांच्या गुणधर्मांचे स्पष्टीकरण एका अधिक सखोल पातळीवर जाऊन देता येते.

या दोन संशोधनात्मक कार्यांमध्ये एक मूलभूत असा ताण आहे. वर्णनात्मक पर्याप्ततेच्या शोधामधून अधिकाधिक गुंतागुंतीच्या व वैविध्यपूर्ण नियमव्यवस्था निर्माण होतात, उलट स्पष्टीकरणात्मक पर्याप्तता साधायची झाली तर परिघावरच्या बाबी सोडून भाषिक रचना या अचल असाव्या लागतात. या ताणामधूनच प्रामुख्याने भाषिक संशोधनाच्या दिशा निश्चित झालेल्या आहेत. या ताणाचे परिमार्जन स्वाभाविकपणे करायचे तर त्यासाठी एका पारंपरिक गृहीतकृत्याला - जे प्रारंभीच्या निर्देशकात्मक व्याकरणामध्येही गृहीत धरले गेले होते त्याला - आव्हान द्यायला हवे होते; हे गृहीतकृत्य म्हणजे भाषा ही एक गुंतागुंतीची नियमव्यवस्था असते, आणि प्रत्येक भाषेसाठी व तिच्या विशिष्ट व्याकरणिक रचनांसाठी खास वेगळे नियम असतात.



अनुक्रमणिका






हिंदीमधील संबंधवाचक रचना (रिलेटिव्ह क्लॉज्) सिद्ध करण्यासाठी वेगळे नियम, स्वाहिलीतील क्रियापदबंधांसाठी वेगळे नियम, जपानीमधील पॅसिव्ह रचनांसाठी वेगळे नियम, इत्यादी. परंतु स्पष्टीकरणात्मक पर्याप्ततेच्या दृष्टीने विचार करता हे [गृहीतकृत्य] बरोबर ठरणारे नाही.

मूळ प्रश्न होता तो नियमव्यवस्थांचे सामान्य गुणधर्म निश्चित करण्याचा होता. हे गुणधर्म भाषाशक्तीचे गुणधर्म मानता यायला हवेत आणि त्यातून [विशिष्ट भाषांच्या संदर्भात] जे काही हाती लागेल ते कमी गुंतागुंतीचे व सर्व भाषांना सारखे असणारे असेल अशी अपेक्षा धरता यायला हवी. प्रारंभीच्या निर्देशनात्मक व्याकरणांनी परंपरेला धक्का दिला होता खरा; परंतु त्याहीपेक्षा अधिक मोठा धक्का सुमारे १५ वर्षांपूर्वी [म्हणजे १९८५च्या सुमाराला] या (स्पष्टीकरणात्मक पर्याप्ततेच्या) प्रयत्नांतून निघालेल्या व्याकरणप्रकल्पामुळे मिळाला. ''सामान्य तत्त्वे व विशिष्ट उपतत्त्वे''(प्रिन्सिपल्ज ॲण्ड पॅरॅमीटर्ज)[१४] असे नाव आता या प्रकल्पाला मिळालेले आहे. या सिद्धांतांमध्ये नियम आणि व्याकरणिक रचना या दोन्ही संकल्पना नाकारलेल्या आहेत. हिंदीतील संबंधवाचक रचना, स्वाहिलीतील क्रियापदबंध, जपानीमधील पॅसिव्ह, इत्यादी रचनांसाठी येथे नियम नसतातच. आपल्याला सुपरिचित असणाऱ्या व्याकरणिक रचना ही एक जंत्री असते व तिला फारतर अनौपचारिक वर्णनात्मक दर्जा देता येतो, परंतु तिला सैद्धान्तिक आधार काहीही नसतो. ''भूतलीय सस्तन प्राणी'' किंवा ''घरगुती पाळीव प्राणी'' या संकल्पनांना [जीवविज्ञानामध्ये] जो दर्जा असेल तसाच दर्जा व्याकरणिक रचनांना असतो. शिवाय, नियमांचे विभाजन भाषाशक्तीची सामान्य तत्त्वे म्हणून केलेले असते; या सामान्य तत्त्वांच्या परस्परप्रक्रियेमधून भाषिक प्रयोगाचे विशिष्ट गुणधर्म हाती लागतात.

भाषाशक्तीची प्रारंभिक स्थिती म्हणजे एखाद्या [इलेक्ट्रिक] स्विचच्या खोक्याला जोडून बसवलेले वायरचे जाळे असे म्हणता येईल. भाषेची सामान्य तत्त्वे म्हणजे एक जाळे असते तर अनुभवाच्या आधारे निश्चित होणारे विविध पर्याय म्हणजे वेगवेगळे स्विच, असे यातून निष्पन्न होते. स्विच एका दिशेने दाबला तर आपल्याला स्वाहिली मिळते; दुसऱ्या दिशेने दाबला तर जपानी मिळते. प्रत्येक मानवी भाषा ही अशा प्रकारे अनेक स्विच विशिष्ट दिशेने दाबण्यामधून - तांत्रिक परिभाषा वापरायची तर विशिष्ट उपतत्त्वांची दिशा ठरविण्यामधून निश्चित होत असते. संशोधन प्रकल्पाला यश मिळाले तर विशिष्ट उपतत्त्वांची दिशा ठरवून दिल्याबरोबर जपानी हाती लागेल, आणि ही प्रक्रिया मानवाला ज्या ज्या भाषा संपादता येणे शक्य असते त्या सर्व भाषांच्या बाबतीत अक्षरशः घडते असे म्हणता येईल. भाषासंपादनाचा जो अनुभवनिष्ठ परिसर असतो त्यांच्यामुळे बालकाला उपलब्ध असणाऱ्या अत्यंत मर्यादित स्वरूपाच्या

माहितीच्या आधारे ही विशिष्ट उपतत्त्वांची [म्हणजे स्विचेसची] दिशा ठरत असते, अशी एक आवश्यक अट इथे लागू पडेल. विशिष्ट उपतत्त्वांच्या स्विचेसची दिशा थोडीशी बदलली तरी त्यातून हाती लागणाऱ्या व्यवस्थांमध्ये खूप भेद निर्माण होऊ शकतो; कारण छोटासा बदल संपूर्ण व्यवस्थेत पसरत जातो, हे ध्यानात ठेवायला हवे. भाषेचे सामान्य गुणधर्म आहेत आणि त्यांना कसेही करून चिमटीत पकडण्याचे कार्य कोणत्याही अस्सल [भाषिक] सिद्धांताने बजावणे आवश्यक आहे.

अर्थात हा एक प्रकल्प आहे; पूर्णत्वाला गेलेली ही [सैद्धान्तिक] निष्पत्ती नव्हे. यातून जे काही अर्धेमुर्धे निष्कर्ष हाती लागतात त्यांची सध्याची मांडणी पुढे बदलून जाईल. तसेच ही संपूर्ण भूमिका अचूक दिशेने चालली आहे अशी खात्री कोणालाही देता येणार नाही, हे वेगळे सांगायला नको. मात्र एक संशोधनप्रकल्प म्हणून हा बराच यशस्वी ठरलेला आहे. वेगवेगळ्या प्रकारची संरचना असणाऱ्या अनेक भाषांचे प्रचंड अनुभवनिष्ठ संशोधन त्यातून होत आहे; पूर्वी ज्यांची मांडणीच होऊ शकली नसती असे प्रश्न त्यातून उभे राहिले आहेत, आणि बुचकळ्यात टाकणारी अनेक उत्तरेही मिळत आहेत. आत्मसातीकरण, विवरण, [भाषिक] दोषांची चिकित्सा आणि इतर बाबींविषयीच्या अनेक प्रश्नांना या प्रकल्पामुळे वेगळी रूपे मिळाली आहेत व हेही निश्चितच फलदायी ठरले आहे. याशिवाय या प्रकल्पाचे भविष्यात काहीही झाले तरी वर्णनात्मक व स्पष्टीकरणात्मक पर्याप्ततेच्या परस्परविरोधी अटींची पूर्तता भाषाविषयक सिद्धान्ताला कशी करता येईल याचे काही सूचन या प्रकल्पातून झालेले आहे. भाषाविषयक सिद्धान्ताची एक किमान रूपरेषा या प्रकल्पामधून प्रथमच हाती लाभलेली आहे.

या संशोधनप्रकल्पाच्या अंतर्गत मुख्य उद्दिष्टे पुढीलप्रमाणे मांडता येतील : सामान्य तत्त्वे आणि विशिष्ट उपतत्त्वे शोधून काढणे, त्यांची सुस्पष्ट मांडणी करून त्यांच्या परस्परसंबंधांचे स्वरूप स्पष्ट करणे, आणि भाषा व तिचा वापर यांच्या इतर पैलूंचे स्पष्टीकरण देण्यासाठी या संकल्पनात्मक चौकटीचा विस्तार करणे [सध्या] अनेक बाबी धूसर आहेत, हे खरे. परंतु भाषेच्या संरचनेविषयी काही नव्या आणि अधिक दूरगामी स्वरूपाच्या प्रश्नांचा ओघ घेण्याइतकी प्रगती निश्चितच झालेली आहे. भाषेची संरचना किती चांगली आहे, हा प्रश्न आपण आता उपस्थित करू शकतो. भाषाशक्ती ही संकल्पना सिद्ध होण्यासाठी ज्या अटी आवश्यक आहेत त्या विचारात घेऊन एखादा महा-अभियंता भाषा रचू शकेल; प्रत्यक्ष मानवी भाषा या अशा रचलेल्या भाषेच्या किती जवळ येतात ?

या प्रश्नांची मांडणी अधिक नेमक्या स्वरूपात होण्याची आवश्यकता आहे, आणि ती विविध प्रकारे करता येईल. भाषाशक्ती ही मन/मेंदूच्या व्यापक संरचनेचा एक

भाग मानता येईल. मन/मेंदूच्या इतर व्यवस्थांशी भाषाशक्तीची परस्परप्रक्रिया होत असते; त्यामुळे भाषाशक्तीचा जर वापर व्हायला हवा असेल तर त्यासाठी काही शर्ती पूर्ण व्हाव्या लागतील. यांना ''आकलनीयतेच्या शर्ती'' (लॅजिबिलिटि कंडिशन्ज्) म्हणता येईल. मन/मेंदूच्या इतर व्यवस्थांना भाषिक प्रयोग ''आकलन'' व्हायला हवेत, आणि विचार व कृती यांच्यासाठी ''सूचना'' म्हणून त्यांचा वापर या व्यवस्थांना करता यायला हवा. उदाहरणार्थ, ध्वनीविषयक सूचनांचे - म्हणजेच भाषेने निर्देशित केलेल्या ''स्वनात्मक प्रतिरूपणां''चे आकलन ऐंद्रिय-कारक (सेन्सरी-मोटर) व्यवस्थांना होणे आवश्यक आहे. उच्चारणसंबंधित आणि संवेदनासंबंधित यंत्रणांची विशेष संरचना अशा प्रकारची असते की, विशिष्ट स्वनात्मक गुणधर्मांचेच आकलन त्यांना होऊ शकते; इतर प्रकारच्या गुणधर्मांचे आकलन होऊ शकत नाही. तेव्हा यंत्रणांमुळे भाषाशक्तीच्या निर्देशनात्मक प्रक्रियांवर आकलनीयतेच्या शर्तींचे बंधन पडत असते. या बंधनामुळे या प्रक्रियांमधून भाषिक प्रयोगांना योग्य तो स्वनात्मक आकार मिळत असतो. भाषाशक्तीकडून मिळणाऱ्या सामग्रीचा उपयोग करणाऱ्या संकल्पनात्मक व इतर व्यवस्थांनाही हे लागू पडते : या व्यवस्थांचे स्वतःचे अंगभूत गुणधर्म असतात व त्यांना भाषेने निर्देशित केलेल्या विशिष्ट प्रयोगांची, विशिष्ट प्रकारच्या ''अर्थस्वरूपी प्रतिरूपणां'ची आवश्यकता असते, इतर प्रकारची प्रतिरूपणे त्यांना आकलन होत नाहीत. आपल्यासमोरचा प्रश्न आता पुढीलप्रमाणे मांडता येईल : भाषेची इतर बाह्य व्यवस्थांशी परस्परप्रक्रिया होत असते व ती होत असताना आकलनीयतेच्या शर्ती भाषेला पाळाव्या लागतात; या शर्ती पूर्ण करण्याच्या दृष्टीने भाषा किती ''चांगला मार्ग'' पुरवते ? या प्रश्नाची मांडणी गंभीरपणे, किंवा अगदी अर्थपूर्णपणेही मांडणे अगदी अलीकडच्या काळापर्यंत शक्य झाले नसते. आता तशी मांडणी करता येणे शक्य आहे, असे दिसते. शिवाय, भाषाशक्ती या दृष्टीने जवळ जवळ ''परिपूर्ण'' असावी अशीही चिन्हे दिसत आहेत. हे जर खरे असेल तर तो एक आश्चर्यजनक निष्कर्ष ठरेल.

''लघुतमवादी प्रकल्प'' (द मिनिमॅलिस्ट प्रोग्रॅम) असे ज्याला नाव मिळाले आहे तो या प्रश्नांचा वेध घेणारा प्रकल्प आहे. या प्रकल्पाचे ठाम मूल्यमापन करणे घाईचे ठरेल. माझे स्वतःचे मूल्यमापन असे आहे की [भाषाविज्ञानाच्या सैद्धांतिक] कार्यसूचीमध्ये या प्रश्नाचा समावेश करणे फलदायी ठरेल, आणि या प्रकल्पातून हाती लागलेले प्रारंभिक निष्कर्ष आशादायक आहेत. [या प्रकल्पातील] मूळ कल्पना आणि [त्याला] यश मिळण्याची शक्यता, यांविषयी मला प्रथम थोडे विवेचन करायचे आहे, आणि त्यानंतर क्षितिजावर उभ्या ठाकलेल्या काही समस्यांकडे मी वळणार आहे.

पारंपरिक गृहीकृत्यांची अत्यंत काळजीपूर्वक पडताळणी करणे हे लघुतमवादी

प्रकल्पामध्ये अत्यावश्यक ठरले आहे. त्यापैकी सर्वात आदरणीय मानले गेलेले गृहीतकृत्य म्हणजे भाषेमध्ये ध्वनी व अर्थ असतात. सध्याच्या परिभाषेत याचे भाषांतर करायचे तर ते सहजपणे पुढील अभ्युपगमाच्या रूपात मांडता येईल : भाषाशक्तीची मन/मेंदूच्या इतर व्यवस्थांशी जी परस्परप्रक्रिया होते ती दोन 'परस्परसन्मुख पातळ्यां'वर (इंटरफेस लेव्हल्ज्) होते. एक ध्वनिसंबद्ध असते, तर दुसरी अर्थसंबद्ध असते. भाषेने निर्देशित केलेल्या कोणत्याही प्रयोगामध्ये एक स्वनात्मक प्रतिरूपण असते, जे ऐंद्रियकारक व्यवस्थेला आकलनीय असते, आणि एक अर्थात्मक प्रतिरूपण असते, जे संकल्पनात्मक व्यवस्थेला तसेच विचार व कृती यांच्या इतर व्यवस्थांना आकलनीय असते.

येथे एक प्रश्न असा निर्माण होतो की परस्परसन्मुख पातळ्यांशिवाय इतर काही पातळ्या असतात का ? भाषेला ''अंतर्गत'' अशा काही पातळ्या, विशेषत: आधुनिक संशोधनामध्ये मांडल्या गेलेल्या पृष्ठस्तरीय व अंत:स्तरीय संरचनेच्या पातळ्या, असतात का ? (उदा० पहा चॉम्स्की, १९६५; १९८१; १९८६). लघुतम प्रकल्पामध्ये असे सिद्ध करण्याचा प्रयत्न आहे की या [म्हणजे पृष्ठस्तरीय व अंत:स्तरीय] पातळ्यांच्या परिभाषेत काही बाबींची जी मांडणी झाली होती ती भाषेचे चुकीचे वर्णन देणारी होती; त्याऐवजी याच बाबी आता परस्परसन्मुख पातळ्यांवर असणाऱ्या आकलनीयतेच्या शर्तींच्या परिभाषेत अधिक चांगल्या प्रकारे मांडल्या जाऊ शकतात. वाचकांपैकी ज्यांना तांत्रिक परिभाषेतील विवेचन ठाऊक आहे त्यांनी प्रोजेक्शन तत्त्व, बाइंडिंग थिअरी, केस थिअरी, चेन कंडिशन, इ०इ० आठवावे.[१५]

परस्परसन्मुखतेच्या गुणधर्माविषयी दुर्बल गृहीतकृत्ये मान्य केल्यानंतर केवळ अनिवार्य असतील अशाच संगणात्मक प्रक्रियांना [लघुतम प्रकल्पात] स्थान असेल, हे सिद्ध करायचा प्रयत्न आपण करतो. या दुर्बल गृहीतकृत्यांपैकी एक म्हणजे शब्दांसारखे एकक भाषेमध्ये असतात. भाषाबाह्य व्यवस्थांना ''पीटर'' आणि ''उंच'' यांसारख्या घटकांचे अर्थविवरण करता यायला हवे. दुसरे गृहीतकृत्य म्हणजे या घटकांची रचना करून ''पीटर उंच आहे'' असे अधिक मोठे प्रयोग साधले जातात. तिसरे गृहीतकृत्य म्हणजे या घटकांना ध्वनी व अर्थ या अंगांचे गुणधर्म असतात. ''पीटर'' या शब्दात आद्यध्वनी ओठ एकत्र करून होणारा असतो आणि हा शब्द व्यक्तीचा निर्देश करण्यासाठी वापरला जातो. तेव्हा भाषेमध्ये तीन प्रकारचे घटक असतात :

(१) ध्वनी व अर्थ यांचे गुणधर्म - यांना 'ध्वनी घटक' व 'अर्थघटक' म्हणतात.

(२) या गुणधर्मांतून वा घटकांमधून निघणाऱ्या अधिक मोठ्या घटकांना 'अर्थवाहक घटक' (लेक्सिकल-आयटम्ज) [किंवा शब्द] म्हणतात; आणि

(३) या 'अणुस्वरूप' घटकांमधून व्यामिश्र प्रयोगांची रचना होते.

यातून एक गोष्ट स्पष्टपणे निष्पन्न होते. ती म्हणजे भाषिक प्रयोगांना निर्देशित करणाऱ्या संगणनीय व्यवस्थेमध्ये दोन मूलभूत प्रक्रिया घडून येत असतात. एका प्रक्रियेत ध्वनिघटक व अर्थघटक यांतून अर्थवाहक घटक रचले जातात; दुसऱ्या प्रक्रियेत या अर्थवाहक घटकांपासून सुरुवात करून इतर जे घटक आधीच्या पातळीवर रचलेले असतात त्यांमधून अधिक मोठ्या वाक्यरचना सिद्ध होतात.

यांपैकी पहिली मूलभूत प्रक्रिया ही मूलतः अर्थवाहक घटकांची [किंवा शब्दांची] एक जंत्री असते. पारंपरिक परिभाषेत बोलायचे तर "शब्दनिधी" म्हणून ओळखली जाणारी ही जंत्री म्हणजे अनियमितांची एक जंत्री असते. [शब्द वा अर्थवाहक घटक] हे ध्वनी व अर्थाचे एक यादृच्छिक साहचर्य असते; आणि भाषाशक्तीने उपलब्ध करून दिलेल्या विकारात्मक गुणधर्मांमधून विशिष्ट निवड करून [शब्द वा अर्थवाहक घटक] हे सिद्ध होत असतात. या विकारात्मक गुणधर्मावरूनच नामे व क्रियापदे ही एकतर एकवचनी किंवा अनेकवचनी असतात. हे ठरते; तसेच नामांना कर्तृकारक व कर्मकारक विभक्ती लागतात, हे ठरते; इत्यादी. संगणनात्मक प्रक्रियेत हे विकारात्मक गुणधर्म अत्यंत महत्त्वाचे कार्य करीत असतात, असे यातून निष्पन्न होते.

[भाषेची] सर्वोत्कृष्ट संरचना अशा प्रकारची असेल की जिच्यामध्ये संगणनाची प्रक्रिया चालू असताना कोणतेही नवे घटक आणले जाणार नाहीत. उदाहरणार्थ, कोणत्याही विशेष चिन्हे किंवा पदबंधात्मक घटक, आणि कोणत्याही शिरोरेषात्मक पातळ्या (बार लेव्हल्ज्)[१६] असणार नाहीत (म्हणजेच पदबंधरचनेचे नियम वा क्ष-शिरोरेषा हा व्याकरणिक घटक असणार नाही; पहा चॉम्स्की १९९५) आकलनीयतेच्या शर्ती किंवा खुद्द संगणनाची प्रक्रिया यांच्यामुळे स्वाभाविकपणे जे संरचनात्मक संबंध आवश्यक ठरतील त्यांच्यापलीकडचे कोणतेही संबंध [लघुतम प्रकल्पात] अंतर्भूत केले जाणार नाहीत. आकलनीयतेच्या शर्तीमुळे आवश्यक ठरणारे संरचनात्मक संबंध म्हणजे स्वनात्मक पातळीवर परस्पसान्निध्य (ॲजसन्जी) किंवा अर्थात्मक पातळीवर परिगणक व चल घटक संबंध (क्वांटिफायर-व्हेरिएबल रिलेशन्ज्). संगणनाच्या प्रक्रियेमुळे स्वाभाविकपणे आवश्यक ठरणारे संरचनात्मक संबंध म्हणजे स्वनघटक वा अर्थघटक यांच्यातील अत्यंत निकटचे स्थानीय संबंध (व्हेरी लोकल रिलेशशन्ज्), जोडलेल्या दोन वाक्यरचनात्मक कर्मांमधील/घटकांमधील संबंध. उदा० सी-कमांड हा संबंध. सॅम्युएल एप्स्टीन (१९९९) याने दाखवून दिल्याप्रमाणे हा संबंध भाषेच्या संरचनेमधील गाभ्याचा संबंध आहे; त्याला आजवर अत्यंत अनैसर्गिक संबंध मानले गेले असले तरी [लघुतम प्रकल्पाच्या] नव्या भूमिकेतून तो पूर्णपणे नैसर्गिक ठरतो. मात्र भाषिक प्रयोगांच्या अंतर्गत रचनेमधील घटकनियंत्रण (गव्हर्मेंट), भाषिक

प्रयोगांच्या अंतर्गत रचनेमधील समनिर्देश करणाऱ्या नामांतील संबंध (बाइंडिंग्), तसेच इतर अनेक प्रकारचे (वाक्यरचनात्मक) संबंध व परस्परप्रक्रिया यांना आपण [लघुतम प्रकल्पाच्या मुख्य गाभ्यातून] वगळणार आहोत.

वर मांडलेल्या या निष्कर्षाच्या पूर्ण विरुद्ध जाणाऱ्या निष्कर्षाला पाठबळ देणारा बराच अनुभवनिष्ठ पुरावा आजवर गोळा होत आलेला आहे, हे अलीकडच्या संशोधनाशी परिचित असणाऱ्या कोणालाही ठाऊक असेल. अधिक वाईट गोष्ट अशी की ''सार्वत्रिक मूलतत्त्वे व विशिष्ट उपतत्त्वे'' या चौकटीमध्ये जे संशोधन झाले आहे व ज्यातून अत्यंत यशस्वी असे निष्कर्ष निघालेले आहेत त्यामागचे एक गाभ्याचे गृहीततत्त्व हे मी वर मांडलेल्या सर्वच निष्कर्षांच्या विरुद्ध जाणारे आहे. हे गृहीततत्त्व म्हणजे या [वर चर्चा केलेल्या बाबीच्या] संबंधात भाषा ही 'अपरिपूर्ण' असते, हे आहे. तेव्हा (आधीच्या सिद्धांतामधील) ही सर्व यंत्रणा अनावश्यक अशी वर्णनात्मक, तांत्रिक प्रणाली (टेक्नॉलाजि) आहे, हे सिद्ध करणे हे (लघुतम प्रकल्पासमोरचे) आव्हानच ठरणार आहे किंवा अधिक चांगला पर्याय म्हणजे हे ''अनावश्यक सामान'' टाकून दिल्यानंतर वर्णनात्मक व स्पष्टीकरणात्मक तत्त्वे अधिक व्यापक बनू शकतील, हे आव्हान [लघुतम प्रकल्पाला] स्वीकारावे लागणार आहे. ते काही असले तरी गेल्या काही वर्षांत झालेल्या संशोधनातून इतके तरी निश्चित दिसते की आजवर ज्या निष्कर्षांचा विचारही करता आला नसता असे निष्कर्ष शक्य आहेत, आणि बहुधा अचूकही आहेत.

भाषा या परस्परांपासून भिन्न असतात ही गोष्ट तर उघडच आहे आणि त्या कोणत्या प्रकारे भिन्न असतात हे आपल्याला जाणून घ्यायलाच हवे. भाषाभिन्नत्व हे स्वनांच्या निवडीमध्ये दिसून येते. एका विशिष्ट मर्यादेमध्ये वेगवेगळ्या भाषा वेगवेगळ्या स्वनांची निवड करीत असतात. दुसरे म्हणजे ध्वनी व अर्थ यांची प्रत्येक भाषेने घातलेली सांगड यादृच्छिक व म्हणून भिन्न असते. या बाबी अगदी सरळ आहेत व त्यांच्याविषयी फार चर्चा करणे आवश्यक नाही. त्यांच्यापेक्षा अधिक वेधक बाब म्हणजे विकारव्यवस्थेच्या बाबतीत आढळणारे भिन्नत्व होय; उदाहरणार्थ, विभक्ती-व्यवस्था. लॅटिनं व त्याहीपेक्षा संस्कृत व फिनिश या भाषांमधील विभक्तीव्यवस्था खूपच समृद्ध असलेल्या आढळतात, उलट इंग्लिशमध्ये ही व्यवस्था नावापुरतीच आहे आणि चिनीमध्ये अदृश्यच झालेली आहे. निदान [वरवर पाहता] असे दिसते खरे. स्पष्टीकरणात्मक पर्याप्तिचा विचार करता हे वरवरचे दृश्य दिशाभूल करणारेही असू शकेल, आणि अलीकडच्या संशोधनावरून (चॉम्स्की १९९५; १९९८) असे दिसते की पृष्ठस्तरीय रूपांमध्ये आढळणारे विभक्तीप्रत्ययांचे वैविध्य खरे पाहता वरवरचे आहे. उदाहरणार्थ, लॅटिनसारखीच विभक्तीव्यवस्था चिनी व इंग्लिश या भाषांत असली

पाहिजे, मात्र तिचे स्वनात्मक पातळीवरचे प्रत्यक्ष रूप भिन्न असलेले दिसते. शिवाय, भाषाभाषांमधील वैविध्य हे प्रामुख्याने विकारव्यवस्थेच्या गुणधर्मांवर आधारलेले असते असेही म्हणता येते. हे जर अचूक असेल तर भाषिक वैविध्य हे शब्दनिधीच्या एका छोट्याशा भागापुरते मर्यादित ठेवता येईल.

आकलनीयतेच्या शर्तीमुळे शब्दनिधीमधील शब्दांचे जे [स्वनात्मक व अर्थात्मक] घटक असतात त्यांचे तिहेरी वर्गीकरण होऊ लागते :

(१) अर्थात्मक घटक, ज्यांचे अर्थाच्या परस्परसन्मुख पातळीवर विवरण होते.

(२) स्वनात्मक घटक, ज्यांचे स्वनांच्या पातळीवर विवरण होते.

(३) या दोन्ही पातळ्यांवर विवरण न झालेले घटक.

परिपूर्ण संरचना असणाऱ्या भाषेमध्ये प्रत्येक घटक एक तर अर्थात्मक असेल किंवा स्वनात्मक; केवळ एखादे स्थान निर्माण करणे वा संगणन सोपे करणे यासाठी असणारी यंत्रणा असे कोणत्याही घटकाचे स्वरूप असणार नाही. असे जर असले तर अविवरणीय [म्हणजे विवरण न होऊ शकणारे] असे कोणतेही आकारिक घटक असणारच नाहीत. अर्थात हीसुद्धा एक अत्यंत तीव्र स्वरूपाची शर्त आहे असे दिसते. रचनात्मक विभक्ती - उदाहरणार्थ, लॅटिनमधील कर्तृकारक व कर्मकारक - यांसारख्या आदिरूपात्मक (प्रोटोटिपिकल) आकारिक घटकांचे अर्थात्मक परस्परसन्मुखतेच्या पातळीवर विवरण होतच नाही आणि स्वनात्मक पातळीवर त्यांचे विवरण आवश्यक नसते. विकारव्यवस्थेमध्ये या प्रकारची इतरही उदाहरणे आहेत.

वाक्यरचनात्मक संगणनाच्या संदर्भामध्ये भाषेच्या संरचनेमध्ये आणखी एक अधिक नाट्यमय स्वरूपाची अपूर्णता आढळते; निदान वरवर पाहता तरी ती अपूर्णता असल्यासारखी वाटते. ''स्थानांतरणाचा गुणधर्म'' ही ती अपूर्णता होय. हा भाषेचा सर्वदूर पसरलेला गुणधर्म आहे. विखुरलेले पदबंध भाषेत सर्वत्र आढळतात. सारख्या स्वरूपाच्या घटकांचे विवरण हे अनेकदा नैसर्गिक स्वरूपाच्या स्थानीय संबंधांच्या आधारे होताना आढळते. (अ) Clinton seems to have been elected. हे वाक्य उदाहरणादाखल घेऊ. येथे elect व Clinton या शब्दांतील संबंध खरे म्हणजे (आ) It seems that they elected Clinton या वाक्यातील संबंधांसारखाच आहे : पारंपरिक भाषेत Clinton हे elect चे प्रत्यक्ष कर्म आहे. म्हणजे (अ)मध्ये seemsचा कर्ता म्हणून त्याचे स्थानांतरण झालेले असले तरी त्याचे विवरण मात्र (आ) प्रमाणेच स्थानीय संबंधाच्या आधारे होते; विकारात्म घटकांचा विचार केला तर कर्ता व क्रियापद परस्परांनुसार चालतात (ॲग्रीमेंट रिलेशन), मात्र त्यांच्यात अर्थात्मक संबंध नसतात; अर्थात्मक संबंध हे क्रियापद elect व स्थानांतरित कर्ता यांमध्ये असतात.

येथे आपल्याला दोन प्रकारची ''अपूर्णता'' आढळते. अविवरणीय घटक, आणि स्थानांतरणाचा गुणधर्म. परिपूर्ण संरचनेचे तत्त्व गृहीत धरले तर या दोन प्रकारच्या अपूर्णतांमध्ये संबंध असतो असे मानावे लागते, व तसा तो असलेला दिसतोसुद्धा : अविवरणीय घटकांचे स्वरूप हे स्थानांतरणाच्या गुणधर्माला कार्यरत करणाऱ्या यंत्रणेचे असते.

ज्या प्रतीकात्म व्यवस्था [म्हणजे चिन्हव्यवस्था] काही विशेष कार्याकरिता रचल्या जातात त्यांच्या रचनेमध्ये स्थानांतरणाच्या गुणधर्माचा अंतर्भाव कधीही करता येत नाही. अशा व्यवस्थांना लक्ष्यार्थाने ''भाषा'' वा ''आकरिक'' भाषा म्हटले जाते; उदा० ''अंकगणिताची भाषा'', किंवा ''संगणकीय भाषा'' किंवा ''विज्ञानाच्या भाषा''. या व्यवस्थांमध्ये विकार-(उप) व्यवस्था नसतात व त्यामुळे अविवरणीय घटकही असत नाहीत. स्थानांतरण आणि विकार हे मानवी भाषांचे खास गुणधर्म आहेत. विशिष्ट कार्यासाठी जेव्हा खास चिन्हव्यवस्था रचल्या जातात तेव्हा मानवी भाषांचे अनेक गुणधर्म त्यांच्यात आणले जात नाहीत; अशा गुणधर्मांपैकी स्थानांतरण व विकार हे दोन महत्त्वाचे गुणधर्म आहेत. मन/मेंदूच्या संरचनेने मानवी भाषेवर आकलनीयतेच्या शर्ती लादलेल्या असतात, त्यांच्याकडे या विशेष कार्यासाठी अस्तित्वात येणाऱ्या चिन्हव्यवस्था दुर्लक्षच करतात.

मानवी भाषांचा स्थानांतरण हा जो गुणधर्म असतो तो कोणत्या ना कोणत्या प्रकारे व्यक्त होतोच होतो; मग तो व्यक्त करणाऱ्या यंत्रणा म्हणजे व्याकरणिक स्थानांतरणे असोत वा इतर प्रकारच्या यंत्रणा असोत. भाषेमध्ये हा गुणधर्म का असावा, हा एक लक्षणीय प्रश्न आहे आणि १९६०च्या दशकापासून त्याची चर्चा चालू असली तरी उत्तर मात्र सापडलेले नाही. त्याचे उत्तर आपण ज्याला पृष्ठस्तरीय संरचनेचे विवरण असे म्हटले आहे त्याच्याशी काही प्रमाणात निगडित असावे, असा संशय मला येतो. पृष्ठस्तरीय संरचनेच्या विवरणात पुढील बाबी अंतर्भूत आहेत : विषयसूत्र-भाष्य (टॉपिक-कॉमेंट), विशिष्टता (स्पेसिफिसिटि), नवी व ज्ञात माहिती, स्थानांतरित झाल्यानंतरही आढळणारा कर्तृवाचक अर्थ, इत्यादी. हे जर खरे असेल तर आकलनीयतेच्या शर्तीमुळेच वस्तुतः स्थानांतरणाचा गुणधर्म [भाषेवर] लादला जातो, असे म्हणायला हवे. आपल्या वैचारिक व्यवस्थांचे हे गुणधर्म असतात (भाषाप्रयोगाच्या संशोधनावरून हे स्पष्ट दिसतेच); या वैचारिक व्यवस्थांमुळे विवरणाच्या शर्ती निर्माण होतात व त्यांच्यामुळेच स्थानांतरणाचा गुणधर्म मानवी भाषेत सापडतो, असे म्हणता येईल. या समस्येवर अनेक प्रकारचे वेधक असे संशोधन सध्या चालू आहे; मात्र मला येथे त्यावर भाष्य करता येणार नाही.

निर्देशनात्मक व्याकरणाच्या अगदी प्रारंभापासून संगणात्मक प्रक्रियांचे दोन

प्रकार आढळतात : (अ) पदबंधरचनेचे नियम : शब्दांच्या साहाय्याने अधिक मोठ्या रचना तयार करणारे नियम; (आ) रचनांतरणाचे नियम : स्थानांतरणाचा गुणधर्म व्यक्त करणारे नियम. या दोहोंची मुळे पारंपरिक सिद्धांतामध्ये आहेत. परंतु (निर्देशनात्मक व्याकरण सिद्धांताच्या विकासात) लवकरच असे लक्षात आले की प्रारंभी वाटले होते तसे त्यांचे स्वरूप नाही; त्यांच्यामध्ये अनपेक्षित स्वरूपाची विभिन्नता आणि गुंतागुंत आहे. ही गुंतागुंत व विभिन्नता केवळ वरवरची असून हे दोन्ही प्रकारचे नियम अधिक सुटसुटीत रूपात मांडता येतात, हे दाखवणे हे त्यावेळच्या संशोधन-प्रकल्पाचे स्वरूप होते. पदबंधरचनांच्या विविधतेच्या प्रश्नाला ''परिपूर्ण'' (पर्फेक्ट) उत्तर म्हणजे त्यांना पूर्ण गुंडाळणे आणि त्याऐवजी ''संयोग करा'' (मर्ज)[१७] अशी एक मूलभूत प्रक्रिया मानणे : या प्रक्रियेत आधीच रचल्या गेलेल्या दोन घटकांचा संयोग होऊन एक मोठा घटक अशा प्रकारे रचला जातो की या मोठ्या संयुक्त घटकांचे व संयोगी घटकांचे गुणधर्म अगदी सारखेच असतात. अलीकडच्या संशोधनावरून असे दिसते की हे लक्ष्य साध्य होण्यासारखे आहे.

तेव्हा पर्याप्ततम (ऑप्टिमल) संगणात्मक प्रक्रियेमध्ये समांतर चालणाऱ्या दोन प्रक्रियांचा अंतर्भाव होतो : एक ''संयोग'' प्रक्रिया आणि दुसरी स्थानांतरण गुणधर्म व्यक्त करणारी रचनांतरणाची वा तत्सम प्रक्रिया. यांतील दुसऱ्या प्रक्रियेमध्ये रचनांतरणाचा जो विभाग आहे तो अत्यंत लघुतम स्वरूपात मांडण्याचे प्रयत्न झालेले आहेत. मात्र पदबंधनरचनेचे नियम जसे पूर्ण काढून टाकता आले तसे रचनांतरणाच्या बाबतीत घडलेले नाही. यातून एक गाभ्याचा नियम हाती लागला, तो म्हणजे 'स्थानांतरण करा' (मुव्ह) - मूलत: कोणताही घटक कोठेही स्थानांतरित करा; त्यावर भाषासापेक्ष वा विशिष्ट दिशेने दाबण्याची - निवड केली की त्यानुसार स्थानांतरण निर्धारित होत जाईल. 'संयोग करा' (मर्ज) प्रक्रियेत 'क्ष' आणि 'य' असे घटक असतात आणि 'य' ला 'क्ष' जोडला जातो. 'स्थानांतर करा' प्रक्रियेत 'क्ष' हा एक घटक घेतला जातो आणि 'क्ष'चाच उपघटक असणारा 'य' हा घटक घेऊन 'य'चा 'क्ष'शी संयोग केला जातो.[१८]

आता पुढचा प्रश्न म्हणजे स्थानांतरणाचा गुणधर्म व्यक्त करणारे घटक ही वस्तुत: अविवरणीय घटकांची यंत्रणाच असते हे दाखविणे, हे सिद्ध करता आले तर संगणात्मक व्यवस्थेच्या दोन प्रकारच्या ''अपूर्णता'' या एकाच प्रकारच्या ठरतील. मी वर असा प्रस्ताव मांडला आहे की वैचारिक व्यवस्थांच्या बाह्य दबावामुळे आकलनीयतेच्या शर्ती लादल्या जातात व त्यातूनच स्थानांतरणाचा गुणधर्म निर्माण होतो. हे जर बरोबर असेल तर अपूर्णता शिल्लकच राहात नाही आणि भाषेची संरचना परिपूर्ण आहे, असेच सिद्ध होते. कारण मन/मेंदूच्या सर्वसामान्य आकरिक स्वरूपामुळे आकलनीयतेच्या

शर्ती निर्माण होतात व या शर्ती पूर्ण करण्यासाठी अविवरणीय घटकाची यंत्रणा वापरली जाते.

ही संयोगाची प्रक्रिया गुंतागुंतीची नसून मूलतः साधी आहे. परंतु तिची सलगपणे मांडणी करणे हे या विवेचनात बसणारे नाही. मूळ सहजज्ञानात्मक कल्पना अशी की परस्परविन्यासाची शर्त पूर्ण करण्यासाठी अविवरणीय घटक पूर्णपणे पुसून टाकावे लागतात, आणि ते तसे पुसून टाकण्यासाठी नको असणारा घटक व त्याला पुसून टाकू शकणारा घटक यांच्यात स्थानीय संबंध असणे आवश्यक असते. अर्थविवरणाची प्रक्रिया ज्या प्रकारे घडते त्याला काही कारणे आहेत, व त्याच कारणांमुळे हे दोन घटक परस्परांपासून बरेच दूर असतात. उदाहरणार्थ, Clinton seems to have been elected. या वाक्यात अर्थात्मक विवरणासाठी elect व Clinton हे शब्द elect Clinton या पदबंधामध्ये स्थानीय संबंधांनी बांधलेले असायला हवेत; म्हणजेच मूळ वाक्य जणू seems to have been elected Clinton असे असायला हवे, तरच अर्थात्मक विवरण योग्य प्रकारे होऊ शकेल. वाक्यातील seems या मुख्य क्रियापदाचे विकारात्म घटक हे अविवरणशील आहेत : हे क्रियापद तृतीय पुरुषी, पुल्लिंगी, एकवचनी रूपात आहे; हे विकारात्म घटक स्वतंत्रपणे वाक्याच्या अर्थामध्ये कोणतीही भर घालीत नाहीत. कारण त्यांच्याशी अन्वय साधणाऱ्या [किंवा मराठी व्याकरणाची परिभाषा वापरायची तर त्यांच्यानुसार चालणाऱ्या] (अॅग्री) नामपदबंधामध्ये ते आहेतच, व त्यामुळे ते काढून टाकता येण्याजोगे आहेत. तेव्हा seemsचे नको असलेले जे घटक (ऑफेंडिंग फीचर्ज) आहेत, ते स्थानीय संबंधामधून काढून टाकायला हवेत; अन्वय (अॅग्रीमेंट) या पारंपरिक वर्णनाचे हे सुस्पष्ट रूप झाले. हे करता येण्यासाठी Clinton या अन्वय साधणाऱ्या (अॅग्रीइंग) पदबंधाच्या जुळणाऱ्या (मॅचिंग) घटकांना seems या मुख्य क्रियापदाचे नको असणाऱ्या घटकांनी आकृष्ट करून घ्यावे लागेल व त्यानंतर स्थानीय जुळणीच्या परिस्थितीमध्ये (कंडिशन्ज् ऑफ लोकल मॅचिंग) पुसून टाकावे लागेल. परंतु आता Clinton हा पदबंध स्थानांतरित झाला आहे, [हे लक्षात घ्यावे लागेल.]

एक ध्यानात घ्या की Clinton या पदबंधाचे फक्त घटक आकर्षित झालेले आहेत; संपूर्ण पदबंधाचे स्थानांतरण वेगळ्या कारणामुळे होते : ऐंद्रिय-कारक व्यवस्थेला या पदबंधापासून वेगळे झालेले घटक ''उच्चारता'' येणार नाहीत वा ''ऐकू''ही येणार नाहीत; या कारणामुळे संपूर्ण पदबंधाचे स्थानांतरण होईल. मात्र जर कोणत्याही एखाद्या कारणाने ऐंद्रिय-कारकव्यवस्था कार्यहीन केली गेली तर फक्त घटकांचेच ''उच्च स्थानांतरण'' (रेझिंग) होईल. An unpopular candidate seems to have been elected. या वाक्यात स्थानांतरण उघडच झालेले आहे.

या प्रकारच्या वाक्यांबरोबरच seems to have elected an unpopular cadidate या प्रकारची वाक्येही आढळतात. येथे an unpopular cadidate हा पदबंध दूरस्थ असला तर seems या क्रियापदाशी तो अन्वय साधतो; म्हणजेच या पदबंधाचे [फक्त] घटक seems कडे एका स्थानीय संबंधानुसार आकर्षित झालेले आहेत. आणि बाकीचा पदबंध मागेच [म्हणजे जेथल्या तेथे] राहिलेला आहे. ऐंद्रिय-कारकव्यवस्था ही कार्यहीन केली जाणे याला ''छुपे स्थानांतरण'' (कव्हर्ट मूव्हमेंट) म्हणतात, आणि या प्रक्रियेचे गुणधर्म अत्यंत लक्षणीय आहेत. अनेक भाषांमध्ये, उदा० स्पॅनिशमध्ये या प्रकारची वाक्ये आढळतात. इंग्लिशमध्येही ती आहेत; मात्र इतर काही कारणांमुळे : एक म्हणजे इंग्लिशमध्ये there हा रिक्त घटक वापरणे आवश्यक ठरते व त्यातून there seems to have been elected an unpopular candidate. असे वाक्य मिळते, आणि दुसरे म्हणजे शब्दक्रमात बदल करणेही आवश्यक ठरते व त्यातून there seems to have been an unpopualr cadidate elected. असे वाक्य मिळते, व या शब्दक्रम-बदलाची कारणेही लक्षणीय आहेत. विशिष्ट उपतत्त्वांच्या निवडीमुळे हे गुणधर्म निर्माण झाले आहेत; या निवडीमुळे भाषेच्या विविध घटकांवर अनेक प्रकारचा परिणाम होतो आणि अत्यंत गुंतागुंतीचे भाषासापेक्ष गुणधर्म दिसू लागतात; परंतु ते भिन्न असतात ते केवळ वरवरच. आपण ज्या उदाहरणाचा विचार करतो आहोत त्यात वास्तविक परिस्थिती पुढीलप्रमाणे मांडता येईल. स्थानीय संबंधात [इतर काही घटकांशी] मिळते जुळते (मॅचिंग) असणाऱ्या अविवरणीय आकरिक घटकांचा लोप (इरेझ) करणे आवश्यक आहे; त्यातून अर्थात्मक सन्मुखतेमध्ये अर्थविवरणासाठी आवश्यक असणारा स्थानांतरणाचा गुणधर्म हाती लागतो.

या संक्षिप्त वर्णनामध्ये अनेक ठिकाणी काही गोष्टी वगळलेल्या आहेत. या सर्व गाळलेल्या जागा भरल्यानंतर एक लक्षणीय असे चित्र उभे राहते व भाषिक प्रकारव्यवस्थेच्या दृष्टीने (टायपॉजिकली) भिन्न असणाऱ्या भाषांच्या संबंधात यातून अनेक प्रकारचे गुंतागुंतीचे निष्कर्ष निघतात. मात्र या सर्वांचा विचार करणे या ठिकाणी अभिप्रेत नाही.

या ठिकाणी अखेरीस मला अगदी थोडक्यात इतर काही बाबींचा विचार करायचा आहे. भाषेच्या अंतर्गत स्वरूपाच्या संशोधनाचे बाह्य विश्वाशी कोणत्या प्रकारे संबंध असतात, याचा विचार करायला हवा. विवेचनाच्या सुलभतेसाठी आपण सोप्या शब्दांत मुद्दा मांडू, समजा पीटरच्या शब्दनिधीमध्ये book असा शब्द आहे. या शब्दाला गुंतागुंतीचे असे स्वनात्मक व अर्थात्मक असे गुणधर्म आहेत. स्वनात्मक गुणधर्मांचा उपयोग उच्चारणासाठी आणि संवेदनाग्रहणासाठी ऐंद्रियकारकव्यवस्था त्यांचा संबंध बाह्य

घटकांशी जोडून वापरतात. उदा० परमाणूंचे चलन, पीटर जेव्हा विश्वाविषयी बोलू लागतो व इतरांच्या बोलण्याचा अर्थ लावू लागतो तेव्हा मनाच्या इतर व्यवस्था अर्थात्म गुणधर्म वापरतात.

ध्वनीच्या अंगाने विश्लेषण कसे करायचे याविषयी ज्याचा दूरगामी परिणाम होऊ शकेल असा वाद नाही. अर्थाच्या विश्लेषणाच्या संबंधात मात्र मूलभूत असे वाद आहेत. स्वनविज्ञान आणि स्वनिमविश्लेषण यांचा म्हणजे ध्वनीच्या बाजूचा अभ्यास ज्याप्रमाणे होतो त्याच धर्तीवर अर्थविषयक प्रश्नांचा विचार करणारे संशोधन अनुभवादी पद्धतीने होते. या संशोधनात book या शब्दाच्या अर्थात्मक गुणधर्मांचा शोध घेतला जातो : हा शब्द म्हणजे क्रियापद नसून प्रतिपादिक/नाम आहे. हा शब्द एका वस्तूचा निर्देश करतो आणि ही वस्तू ''पाणी'' या द्रव्यासारखी नसते किंवा ''आरोग्य'' या अमूर्त कल्पनेसारखीही नसते, इत्यादी. हे गुणधर्म book या शब्दाचे गुणधर्म आहेत की त्या शब्दाशी निगडित संकल्पनेचे आहेत, असा प्रश्न विचारता येईल. सध्या उपलब्ध असलेल्या ज्ञानचौकटीमध्ये या दोन पर्यायांमध्ये नीटसा भेद करता येत नाही; मात्र या ठिकाणी काही अनुभवनिष्ठ बाबी संशोधनानंतर हाती लागतील, अशी आशा बाळगता येईल. यातला कोणताही पर्याय स्वीकारला तरी book या शब्दाच्या अंतर्गत असणाऱ्या काही गुणधर्मांमुळे वर उल्लेखिलेल्या पद्धतीच्या अर्थविवरणांचे निर्धारण होत असते.

भाषेच्या प्रयोगाचे संशोधन केल्यावर असे आढळते की शब्दांचे जे विवरण होत असते ते त्या शब्दाची द्रव्यात्मक रचना, आकार, त्याचा [विशिष्ट व्यक्तीला] अभिप्रेत असलेला आणि नेहमीचा वापर, संस्थात्मक कार्य, इत्यादी गोष्टींच्या आधारे होत असते. या गुणधर्मांच्या आधारे ज्या कोटी निर्माण होतात - या कोटी म्हणजे अर्थघटकच असतात असे मी मानतो - त्यांच्या मदतीने वस्तूंचे स्वरूप निश्चित केले जाते व त्यांचे वर्गीकरणही होते. हे [अर्थात्मक] गुणधर्म ध्वनीची निश्चिती करणाऱ्या स्वनात्मक गुणधर्मासारखेच असतात. भाषेच्या प्रत्यक्ष प्रयोगामध्ये या अर्थात्मक गुणधर्मांची दखल विविध प्रकारे घेता येते. समजा, ग्रंथालयामध्ये टॉलस्टॉयच्या 'वॉर अँड पीस'च्या दोन प्रती आहेत; त्यांपैकी एक पीटर घेऊन जातो तर दुसरी जॉन नेतो. पीटर व जॉन यांनी एकच पुस्तक नेले की वेगवेगळी पुस्तके नेली ? ''पुस्तक'' या शब्दाचा भौतिक वस्तुरूप पैलू [म्हणजे मूलतः मूर्त पैलू] ध्यानात घेतला तर त्यांनी वेगवेगळ्या वस्तू नेलेल्या असल्यामुळे वेगवेगळी पुस्तके नेली [असे म्हणता येते], ''पुस्तक'' या शब्दाचा अमूर्त [म्हणजे सामान्य, साधारणीकृत] पैलू ध्यानात घेतला तर त्यांनी एकच पुस्तक नेले [असे म्हणता येते.] भौतिक वस्तुरूप पैलू आणि अमूर्त पैलू यांना आपण एकाच वेळी ध्यानात घेऊ शकतो; उदाहरणार्थ, ''तो जे पुस्तक

लिहायचा बेत करतो आहे ते जर त्याने कधी लिहिलेच तर त्याचे वजन किमान पाच पौंड तरी भरेल'', किंवा ''त्याचे पुस्तक देशातल्या प्रत्येक दुकानात आहे'', यांसारख्या विधानांत दोन्ही पैलू ध्यानात घेतलेले आहेत. याच धर्तीवर असे विधान करता येते की आपण पांढरा दरवाजा रंगवून त्यातून चालत जाऊ शकतो. येथे ''त्यातून'' मधील सर्वनाम संदिग्ध राहील [म्हणजेच ''त्यातून'' म्हणजे कशातून हे संदिग्ध राहील]; ''त्यातून''मधील सर्वनामाने [वास्तव] दरवाजाचा किंवा [रंगचित्रातील] आकाराचा निर्देश होऊ शकेल किंवा दरवाजाच्या पार्श्वभूमीचा निर्देश होऊ शकेल. बँकेने व्याजदर वाढवल्याबरोबर ती उडवली गेली, किंवा उडवली जाऊ नये म्हणून बँकेने व्याजदर वाढविले, अशी विधाने आपण करू शकतो. येथे ''ती'' हे सर्वनाम आणि ''उडवली जाऊ नये'' या वाक्यांशामधील रिक्त [म्हणजे पारंपरिक परिभाषेत अध्याहृत] असणारे व्याकरणिक कर्तृनाम, या दोहोंमधून एकाच वेळी भौतिक व संस्थात्मक [म्हणजे मूलत: अमूर्त] अशा दोन्ही घटकांचा निर्देश होतो.

या प्रकारच्या बाबींसंबंधीची तथ्ये बहुधा स्पष्ट असतात; परंतु ती क्षुल्लक स्वरूपाची मात्र नसतात. तेव्हा निर्देशावर अवलंबून असणाऱ्या घटकांना, मग त्या घटकांवर कितीही बंधने असोत, काही भेद पाळावे लागतात, तर काहीकडे दुर्लक्ष करावे लागते; आणि हे वेगवेगळ्या शब्दांच्या बाबतीत कोणत्या वेगवेगळ्या प्रकारे घडेल, हे सांगता येणार नाही. [भाषेच्या] या गुणधर्माचे संशोधन अनेक प्रकारे करता येते : भाषासंपादन, भाषाभाषांमधील समान घटक, नव्याने घडविलेली रूपे, इत्यादी. येथे आपल्याला लागलेला शोध गुंतागुंतीचा आहे; आणि कोणत्याही पुराव्याआधीच तो लागलेला आहे, व त्यात आश्चर्य काहीच नाही; मात्र त्यामुळे भाषांमध्ये समानपणे आढळणारे गुणधर्म आपल्या हाती लागले आहेत. मानवी भाषेमध्ये असे काही गुणधर्म असतील अशी अपेक्षा धरायला कोणतेही अनुभवपूर्व कारण आपल्याला देता येणार नाही; मंगळावरील भाषा यापेक्षा वेगळी असू शकेल. विज्ञान व गणित यांच्या चिन्हव्यवस्था [भाषेपेक्षा] नि:संशय वेगळ्या आहेत. [मानवी] मेंदूसारखेच सर्वसामान्य गुणधर्म असणाऱ्या वस्तूंना समान जैवरासायनिक नियम लागू पडतात [असे गृहीत धरता येईल]. आता या जैवरासायनिक नियमांचा परिपाक म्हणून मानवी भाषेचे हे विशिष्ट गुणधर्म किती प्रमाणात मानता येतील, याचा कोणालाही थांगपत्ता लागलेला नाही. [भाषेच्या अभ्यासाच्या] आणखी दूरवरच्या क्षितिजावर असणारा हा आणखी एक महत्त्वाचा प्रश्न आहे.

याच धर्तीवर अर्थविवरणाची हाताळणी करणारी एक वेधक भूमिका सतराव्या व अठराव्या शतकांमध्ये विकसित झाली. गोष्टींना ''आपण जे सत्त्व बहाल करतो ते केवळ काल्पनिक असते.'' व ते मानवी बुद्धीने प्रस्थापित केलेले असते, या ह्यूम

याने मांडलेल्या तत्त्वाचा या भूमिकेत बराच वापर करण्यात आला (Hume 1740 : Section 27). ह्यूमचा निष्कर्ष अगदी पटण्याजोगा आहे. माझ्या लेखनाच्या टेबलावर असणाऱ्या पुस्तकाचे जे काही विलक्षण गुणधर्म आहेत ते त्या पुस्तकाच्या अंतर्गत घडणीमधून निघालेले नाहीत; उलट लोक कोणत्या प्रकारे विचार करतात आणि हे विचार व्यक्त करण्यासाठी ते ज्या संज्ञा वापरतात त्यांचे अर्थ काय आहेत, यावर ते गुणधर्म अवलंबून आहेत. विश्वाविषयी विचार करणे आणि बोलणे यांसाठी शब्दांचे अर्थात्मक गुणधर्म वापरले जातात; आणि त्यामागे [मानवी] मनाच्या साधनसामग्रीने उपलब्ध करून दिलेले दृष्टिकोण आधारभूत असतात; स्वनात्मक विवरण ज्या प्रकारे होते ती पद्धत यापेक्षा वेगळी असते. समकालीन भाषाविषयक तत्त्वज्ञानाने या संदर्भात एक वेगळीच पद्धत विकसित केली आहे. शब्द कशाचा निर्देश करतो असा प्रश्न येथे विचारला जातो. आणि त्यातून वेगवेगळ्या प्रकारची उत्तरे मिळतात. परंतु मुळात विचारलेल्या प्रश्नालाच स्पष्ट असा अर्थ नसतो. ''पुस्तक'' या शब्दाचे उदाहरण प्रातिनिधिक मानता येईल. पीटर आणि जॉन हे ग्रंथालयामधून त्याच प्रती घेऊन जात असतील तर टॉलस्टॉयचे 'वॉर ॲण्ड पीस' या वाक्यप्रयोगाने कोणत्या वस्तूचा निर्देश होतो, असा प्रश्नच अर्थहीन आहे. आपण या किंवा त्या प्रकारे विचार करतो आणि बोलतो त्या वेळी अर्थात्मक घटक कसे वापरतो यावर या प्रश्नाचे उत्तर अवलंबून असते. सर्वसामान्यपणे कोणताही शब्द, मग तो कितीही साधा असो, हा [''बाह्य''] विश्वातील किंवा आपल्या ''धारणाविश्वा''तील एखादी गोष्ट [स्वत:हून] निवडत नसतो. या संबंधातील रूढीनिष्ठ गृहीतकृत्ये मला अत्यंत संशयास्पद वाटतात.

पारंपरिक विचाराला चालना देणाऱ्या काही बाबींचा विचार करण्याचा प्रयत्न आधुनिक निर्देशनात्मक व्याकरणाने केलेला आहे असे मी नमूद केलेलेच आहे. मानव व इतर जीव किंवा यंत्रे यांच्यातील ''खराखुरा भेद'' त्यांच्या कृती करण्याच्या शक्तीमध्ये असतो व ही शक्ती भाषेच्या सर्वसाधारण वापरामधून स्पष्टपणे दिसून येते, या देकार्तप्रणीत कल्पनेचा विशेष उल्लेख या संदर्भात करायला हवा (Descartes 1649/1927:360). देकार्तची मूळ कल्पना अशी होती की भाषेचा सर्वसाधारण वापर हा परिमित स्वरूपाचा नसतो. अंतर्गत स्थितीने तो प्रभावित होत असतो, परंतु निर्धारित होत नसतो; प्रसंगांना तो अनुरूप असतो, परंतु प्रसंग हे त्याचे कारण ठरू शकत नाहीत; तो सुसंगत असतो, आणि ऐकणाऱ्या व्यक्तीने व्यक्त केलेल्या विचारांना चालना देणारा असतो, इत्यादी. मी ज्या संशोधनाची चर्चा करतो आहे त्याचे उद्दिष्ट म्हणजे भाषेच्या सर्वसाधारण वापरामध्ये कार्यरत असणाऱ्या घटकांपैकी काहींना शोधून काढणे हे आहे. अर्थात या घटकांपैकी काही घटकांना शोधून काढायचे उद्दिष्ट येथे आहे, [सर्व घटकांना नव्हे, हे मात्र लक्षात ठेवायला हवे.]

भाषेच्या वापरामध्ये कोणत्या यंत्रणा कार्यरत असतात हे शोधून काढणे, हे निर्देशनात्मक व्याकरणाचे उद्दिष्ट असल्याने सर्वसामान्य जीवनामध्ये या यंत्रणा सर्जनशील रीतीने कशा वापरल्या जातात याच्या अभ्यासामध्ये या व्याकरणाने भर घातलेली आहे. या यंत्रणा कशा वापरल्या जातात हे कोडे देकार्तवाद्यांनाही पडलेले होते, आणि त्यांच्याप्रमाणे आपल्यासाठीही तो एक कूटप्रश्नच आहे; मात्र या कार्यरत असणाऱ्या यंत्रणांविषयी आज बरेच ज्ञान जमा झालेले आहे.

या संदर्भामध्ये भाषेचा अभ्यास हा इतर अवयवांच्या अभ्यासाशी खूपसे साम्य सांगणारा आहे. घनपदार्थासारख्या विखुरलेल्या चेतकांचे विवरण मेंदू कोणत्या यंत्रणेने करत असतो, याचा शोध दृश्य संवेदनेच्या संशोधनातून घेतला गेलेला आहे, किंवा टेबलावरच्या पुस्तकापर्यंत हात पोहोचण्यासाठी मेंदूची कोणती यंत्रणा कार्यरत झालेली असते याचा शोध ऐंद्रियकारक यंत्रणेच्या संशोधनामधून घेतला गेलेला आहे. परंतु लोक टेबलावरच्या पुस्तकाकडे पाहण्याचा निर्णय कसा घेतात किंवा ते उचलण्याचा निर्णय कसा घेतात, हे प्रश्न ही विज्ञाने विचारात घेत नाहीत, आणि दृश्य किंवा ऐंद्रियकारक यंत्रणांच्या किंवा इतरही यंत्रणांच्या, उपयोगाविषयीच्या तर्कवितर्कांना या विज्ञानांमध्ये काहीही किंमत नसते. भाषेच्या उपयोगामध्ये मानवाच्या या कुवती अत्यंत वेधक रीतीने मूर्त होत असतात आणि पारंपरिक विचारामध्ये या कुवतीनाच गाभ्याचे स्थान मिळालेले आहे; सतराव्या शतकाच्या प्रारंभकाळात देकार्तने असे म्हटले की या [म्हणजे भाषेच्या उपयोगामध्ये अत्यंत वेधक रीतीने मूर्त होणाऱ्या] मानवाच्या कुवती म्हणजे ''आपल्यापाशी सर्वश्रेष्ठ म्हणून जे काही असू शकेल'' आणि ''जे खरोखरीच आपले आहे'' त्याचा एक भाग आहेत. देकार्तच्या आधी सुमारे पन्नास वर्षे जुआन हुआर्टे या स्पॅनिश तत्त्वज्ञ-डॉक्टरने असे नमूद करून ठेवले होते की मानवाची सर्वसामान्य बुद्धीची ''निर्देशनशील शक्ती'' आणि त्याच्या कृती या ''प्राणी व झाडेझुडपे'' यांना परक्या असतात, मात्र सर्जनशील कल्पनाशक्तीच्या अस्सल कार्याचा विचार करता ही शक्ती म्हणजे बुद्धीचा एक निम्न पातळीवरचा आविष्कारच होय (Huarte 1575/1698:3: शिवाय पाहा Chomsky 1966:781) हा निम्न पातळीवरचा आविष्कारही आपल्या आजच्या सैद्धांतिक आवाक्यापलीकडचा आहे; मात्र त्यात कार्यरत असणाऱ्या यंत्रणांचे संशोधन आपण करू शकतो.

अलीकडच्या काळात या यंत्रणांचा अभ्यास अनेक क्षेत्रांमध्ये होतो आहे, व त्यात भाषेच्या क्षेत्राचाही समावेश आहे. आता आपल्यासमोर उभे राहणाऱ्या समस्या अवघड आहेत आणि आव्हान देणाऱ्याही आहेत. परंतु अजूनही अनेक गूढे ''विज्ञान'' असे आपण ज्याला म्हणतो त्या मानवी संशोधनाच्या कक्षेबाहेरच राहतात. मानव हा सजीव जगाचा एक भाग आहे हे लक्षात घेतले तर हा निष्कर्ष आपल्याला आश्चर्यकारक तर

वाटू नयेच आणि कदाचित क्लेशकारकही वाटू नये.

**टीपा**

[चॉम्स्की यांच्या मूळ लेखात टीपा नाहीत. खालील सर्व टीपा मराठी वाचकांसाठी तयार केलेल्या आहेत. भाषांतरातील चौकटी कंस हेही मुळात नाहीत; भाषांतर मुळाबरहुकूम ठेवूनही अधिक स्पष्टीकरण मिळावे म्हणून त्या दिलेल्या आहेत. गोल कंस मात्र मुळातलेच आहेत.]

१. **रेने देकार्त (१५९६-१६५०) :** फ्रेंच गणितज्ञ व तत्त्वज्ञ. रेने देकार्त (१५९६-१६५०) आणि विल्हेम व्हॉन हुम्बोल्ट (१७६७-१८३५) या सतराव्या-अठराव्या शतकातील तत्त्वज्ञांनी मानवी मनाच्या व ज्ञानाच्या स्वरूपाविषयी जी तत्त्वे मांडलेली होती ती आपल्या स्वत:च्या संशोधनाच्या प्रकल्पामध्ये केंद्रवर्ती स्वरूपाची ठरलेली आहेत अशी मांडणी चॉम्स्की यांनी Cartesian Linguistics : A Chapter in the History of Rationalist Thought (1966). आणि Language and Mind (1972) या आपल्या ग्रंथांमधून केलेली आहे.

२. **डेविड ह्यूम (१७११-१७७६) :** ब्रिटिश अनुभववादी तत्त्वज्ञानाचा प्रमुख समर्थक.

३. **गॅलिलिओ गॅलिलि (१५६४-१६४२) :** इटालियन गणितज्ञ, खगोलवैज्ञानिक व पदार्थवैज्ञानिक. विद्येच्या पुनरुज्जीवन काळातील व युरोपातील नव्या विज्ञानाचा अग्रणी. येथे २४ अक्षरांचा त्याने केलेले उल्लेख प्राचीन ग्रीक लिपीला लागू पडतो, कारण प्राचीन ग्रीक लिपीमध्ये २४ मुळाक्षरे होती. मात्र अभिजातकालीन रोमन लिपीमध्ये २३ मुळाक्षरेच होती. मध्ययुगीन कालखंडामध्ये I हे अक्षर J पासून वेगळे झाले, म्हणजेच एकाची दोन अक्षरे झाली, तर V हे अक्षर U व W यांच्यापासून वेगळे झाले, म्हणजेच एकाची तीन अक्षरे झाली, व अशा प्रकारे इंग्लिशसाठी वापरली जाणारी रोमन लिपी २६ मुळाक्षरांची बनली. मात्र इतर युरोपीय भाषांनी लॅटिन मुळाक्षरांचा स्वीकार करताना K व W ही अक्षरे वापरली नाहीत, म्हणजेच या भाषाही रोमन लिपीची २४ अक्षरेच वापरतात.

४. **पोर्ट रॉयल व्याकरण :** सतराव्या शतकामध्ये व्हर्साइ (Versailles) या फ्रान्समधील शहरात पोर्ट रोयाल हे एक धर्मपीठ होते. या पीठातील काही तत्त्वज्ञांनी Grammaire Generale etraisonnee (1660) हा ग्रंथ प्रसिद्ध केला. यालाच पोर्ट रॉयल व्याकरण म्हटले जाते. त्यामध्ये सर्व मानवी भाषांमध्ये आढळणाऱ्या सामान्य (तार्किक) तत्त्वांची चर्चा आहे.

५. **जनुक किंवा gene :** हे जीवाच्या शरीराविषयी आनुवंशिक माहिती साठविणारे एकक मानले जाते. जीवांच्या पेशीमध्ये क्रोमोसोम हा एक सूक्ष्म धाग्यासारखा घटक असतो. या क्रोमोसोममध्ये जनुके असतात व ती डी.एन्.ए. किंवा

deoxyribonucleic acid या सेंद्रिय रासायनिक द्रव्याची बनलेली असतात. यातच जीवाच्या शरीराविषयीची आनुवंशिक माहिती साठविलेली असते. भाषिक अवयव हा इतर अवयवांप्रमाणेच मूलत: जनुकांचा आविष्कार असतो. हा चॉम्स्की यांचा दावा जीवविज्ञानामध्ये आणि विशेषत: मज्जाविज्ञानामध्ये मान्य होण्यासारखा आहे, अशी भूमिका स्टीव्हन पिंकर यांनी मांडली आहे; पाहा : Pinker. Steven 1994. The Language Instinct : How the Mind Creates Language (NY: William Morrow & Co.) या ग्रंथातील ''Language Organs and Grammar Genes'' हे प्रकरण. मात्र हे मान्य व्हायला अजून बऱ्याच संशोधनाची गरज आहे. परंतु भाषेला जैविक अधिष्ठान असते की नाही, ही एक महत्त्वाची वैज्ञानिक समस्या आहे, यात शंकाच नाही. मानवी ज्ञानशक्तीचा वैज्ञानिक अभ्यास मनोविज्ञानामध्ये होतो; नैसर्गिक विज्ञानांपेक्षा हा अभ्यास मूलत: वेगळा नसतो. कारण मन हा एक मानवी शारीर अवयव म्हणूनच येथे कल्पिलेला असतो, या चॉम्स्की यांच्या भूमिकेमधून त्यांनी मन ही शरीरापासून स्वतंत्र संकल्पना न मानता मन/मेंदू अशी जोड-संकल्पना सिद्ध केलेली आहे. व या लेखात सर्वत्र तिचाच वापर त्यांनी केलेला आहे.

६. **''मी''**: चॉम्स्की यांच्या या उदाहरणातील ''मी'' अर्थातच इंग्लिश भाषक आहे.

७. **निर्देशनात्मक व्याकरण (जनरेटिव्ह ग्रामर)** : याविषयीच्या अधिक चर्चेसाठी पाहा : मालशे, मिलिंद २००४ आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन. मुंबई : लोकवाङ्मयगृह, प्रकरण ४.

८. **ज्ञानात्मक क्रांती** : ही क्रांती गॅलिलिओने खगोलविज्ञानात घडवून आणलेल्या क्रांतीसारखी होती असा चॉम्स्की यांचा दावा आहे.

९. **अमेरिकन संरचनावादी भाषाविज्ञान** : याविषयीच्या अधिक चर्चेसाठी पाहा : मालशे, मिलिंद २००४ आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन. मुंबई : लोकवाङ्मयगृह, प्रकरण ३.

१०. **विल्हेम व्हॉन हुम्बोल्ट (१७६७-१८३५)** : जर्मन तत्त्वज्ञ व भाषाकोविद. भाषेच्या वापरातून वापरणाऱ्या व्यक्तीची संस्कृती व व्यक्तिमत्त्व व्यक्त होत असते, अशी भूमिका मांडली.

११. **आकारिक विज्ञाने (फॉर्मल सायन्सेज्)** : विज्ञानाला अनुभवाधिष्ठित आणि आकारिक वा तार्किक असे दोन पैलू असतात, त्यापैकी आकारिक वा तार्किक पैलूवर भर देणारे संशोधनप्रकल्प.

१२. **द्वितीय भाषा** : म्हणजे मातृभाषेनंतर वा निजभाषेनंतर शिकलेली भाषा.

१३. हा काळ म्हणजे वयाच्या १८व्या महिन्यापासून ४८व्या महिन्यापर्यंत असतो

असे वैज्ञानिक मानतात.

१४. Principles म्हणजे सर्व भाषांमध्ये सापडणारी सामान्य तत्त्वे तर Parameters म्हणजे भाषाविशिष्ट गुणधर्म किंवा उपतत्त्वे.

१५. Projection principle, binding theory, case thoery, the chain condition इत्यादी सर्व संकल्पना व तत्त्वे चॉम्स्की यांनी 'गव्हर्मेंट अँड बाइंडिंग' या टप्प्यात विकसित केली होती. पाहा : मालशे, मिलिंद २००४ आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धांत आणि उपयोजन. मुंबई, लोकवाङ्मयगृह. प्रकरण ४.

१६. **शिरोरेषात्मक पातळ्या किंवा (बार लेव्हल्स)** : कोणत्याही पदबंधामध्ये त्याच शब्दजातीचे घटक येऊ शकतात. उदाहरणार्थ, नामपदबंधामध्ये नाम हा एक घटक असू शकतो. याचे चिन्हांकन करण्यासाठी वापरण्यात येणारी पद्धती.

१७. येथे Merge आणि Move अशा दोन रचनांतरणप्रक्रियांची चर्चा चॉम्स्की करीत आहेत. हे लेखन तांत्रिक असल्यामुळे यांचे भाषांतर ''संयोग करा'' आणि ''स्थानांतरण करा'' असे येथे केले आहे; परंतु अधिक अनौपचारिक परंतु सुटसुटीत असे ''जोडा'' आणि ''हलवा'' असेही पर्याय मराठीत उपलब्ध आहेत.

१८. येथे चॉम्स्की यांचा मुद्दा असा आहे की स्थानांतरण आणि संयोग या दोन प्रक्रिया नसून स्थानांतरणाला संयोगाचाच एक प्रकार मानता येणे शक्य आहे. त्यामुळे लघुतम प्रकल्पामध्ये ''संयोग करा'' एवढे एकच रचनांतरण शिल्लक राहते.

**संदर्भसूची**

[मूळ लेख हा पुस्तकातील एक प्रकरण असल्याने त्याला मुळात वेगळी संदर्भसूची नाही. या लेखाच्या भाषांतरात येणारे संदर्भ मूळ पुस्तकाच्या सूचीतून निवडून पुढे दिले आहेत.]

Chomsky, Noam (1965) *Aspects of the Theory of Syntax.* Cambridge MA, MIT Press.

Chomsky, Noam (1966) *Cartesian Linguistics.* Harper and Row, New York.

Chomsky, Noam (1981a) *Lectures on Government and Binding.* Dordrecht, Foris.

Chomsky, Noam (1986) *Knowledge of Language.* New York, Praeger.

Chomsky, Noam (1995c) *The Minimalist Program* Cambridge, MA. MIT Press.

Chomsky, Noam (1998) *"Minimalist inquiries : the framework".*

MS, MIT.

Descartes, Rene (1649/1927) Letter (to Morus). In R.M. Eaton. ed., *Descartes Selections.*

Epstein, Samuel (1999) *"UN-principled syntax and the derivation of syntactic relations."* In Samuel Epstein and Norbert Hornstein. eds. Working Minimalism. Cambridge. MA, MIT Press.

Galilei, Galileo (1632) *Dialogues on the Great World Systems,* as translated by Thomas Salusbury, 1661.

Huarte, Juan (1575) *Examen de Ingenios.* Translated by Bellamy, 1698.

Hume, David (1740/1978) *A Treatise of Human Nature.* Edited by L.A. Selby Bigge. Second edition revised by P.H. Nidditch. Oxford, Clarendon Press.

Hume, David (1748/1975) *An Enquiry Concering Human Understanding*, Edited by L.A. Selby - Bigge : third edition, revised by P.N. Nidditch, Clavendon Press, Oxford.

Hume, David (1841) *The History of England : From the Invasion of Julius Ceasar to the Revolution in 1688.* London, 6 volumes, T. Cadell.

■

---

## ‘भाषा आणि जीवन’कडे परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- ‘प्रकाशाचे अंग’, डॉ. नीलिमा गुंडी, स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे ३०. २००५, पृष्ठे ८०, किंमत रु. ८०/-
- ‘माय मराठी... कशी लिहावी... कशी वाचावी ?’, दिवाकर मोहनी, लिपिरूपदा प्रकाशन, पुणे ४. २००५, पृष्ठे ४४, किंमत रु. ३०/-
- ‘पुर्वाई’ (अनिवासी भारतीय कवयित्रींच्या कविता) अनुवाद - भगवान ठग, महाराष्ट्र अनुवाद परिषद प्रकाशन, बुलढाणा.

---

# अंकीकरण आणि भाषा

सदाशिव देव

सध्या दूरदर्शन आणि वृत्तपत्रातून अंकिय यंत्रांच्या, उपकरणांच्या जाहिराती वारंवार वाचावयास मिळतात. डिजिटल कॅमेरा, डिजिटल दूरदर्शन, डिजिटल वॉशिंग मशीन, डिजिटल रेडिओ अशी नाना प्रकारची यंत्रे बाजारात उपलब्ध आहेत. या यंत्रांच्या जाहिरातीत 'डिजिटल' हा शब्द एखाद्या पुढाऱ्यासारखा मिरवीत असतो. आपल्या सदऱ्याच्या खिशात आता फिरता दूरध्वनी लटकत असतो. त्यावर असलेल्या बटनावर छापलेल्या २ या अंकाशेजारी abc, ३ शेजारी def ... ९ शेजारी wxyz अशी अक्षरे छापलेली आढळतात. यातून लहान स्वरूपाचे निरोप पाठवणे सोयीचे असते. पण प्रत्यक्ष यंत्रामधून ऐकणाऱ्याच्या दूरध्वनीपर्यंत काय पोचते याचा विचार वापरणारा कधीच करत नाही. संगणकावर आपण इंग्रजी अक्षरे मुद्रित करतो तेव्हा या यंत्राच्या आत काय प्रक्रिया चालू असतात हा विचारही आपण करीत नाही. खरे तर संगणकाला फक्त अंकांची भाषा समजते; त्याला अक्षरे समजण्यासाठी काही गणितीय व्यवस्था असावी असे लक्षात येत नाही. वर नोंदलेली सर्व यंत्रे आहेत त्यामुळे त्यांच्या पोटात काय सुरू आहे याची चिंता करण्याचे कारण नाही असे यंत्र वापरणारे गृहीत धरतात. हे अगदी नैसर्गिकच आहे. पण भाषेचा अंकाशी जवळचा संबंध आहे व हे नाते महत्त्वाचे आहे असे म्हटले तर आपले डोळे नक्कीच मोठे होतील. हे नाते समजून घेण्याची वेळही आता जवळ आली आहे. कारण दिवसेंदिवस भाषेतील विज्ञानाची उपयुक्तता वाढत आहे, म्हणून अंकीकरणाची प्रक्रिया कशी होते ते समजून घेणे उपयुक्त ठरेल.

भाषिक व्यवहारात एखादी घटना अंकाच्या उपयोजितेतून व्यक्त केली की संदेशायन अगदी स्पष्ट होते. 'काल मला बराच ताप आला होता.' या विधानाने जे विज्ञापन होईल त्यापेक्षा जास्त विज्ञापन काल मला १०२° सें. एवढा ताप होता, या विधानाने होतो. शरीरातील तापाचे अंकीकरण करण्यासाठी पारा असलेला तापमापक यासाठी वापरावा लागतो. वर्षाचे पर्जन्यमान, दिवसाचे तपमान, विमानाचा वेग, दिवसातील घड्याळाने दाखवलेली वेळ हे सर्व व्यवहार आपण अंकीकरणाने व्यक्त करतो. हा प्रयोग जीवनातल्या अन्य क्षेत्रात जितका व्यापक होईल, तितके व्यवहार स्पष्ट व रेखीव पद्धतीने विज्ञापित होऊ शकतील. विज्ञानाने लावलेल्या अनेक शोधांमुळे अंकीकरण करण्याची शक्यता आता वाढली आहे.



अनुक्रमणिका






अंकगणितात आपण ०, १, २,...९ पर्यंत १० अंक शिकतो. या दहा चिन्हांच्या उपयोगातून कितीही लहान किंवा कितीही मोठी संख्या लिहिता येते. या पद्धतीने लिहिलेल्या संख्येला 'दशमान पद्धत' म्हणतात. पूर्वी हाताच्या बोटांनी संख्या निर्देशित करीत असत. यासाठी हाताची १० बोटे वापरता येत. या कारणाने ही दशमान पद्धती निर्माण झाली. याचा अर्थ असा की आपण १०पेक्षा कमी, किमान दोन व दहापेक्षा जास्त चिन्हे घेऊन कोणतीही संख्या लिहू शकतो. माणसाला बोटेच नसती व दोन हात असते तर पूर्वीपासूनच दशमान पद्धतीऐवजी द्विमान पद्धती आली असती व त्यासाठी ० आणि १ ही दोन चिन्हे पुरी झाली असती.

विजेचा शोध लागल्यामुळे या ऊर्जेवर प्रकाशासाठी दिवे लावणे सुरू झाले. विजेवर चालणाऱ्या दिव्याच्या दोनच स्थिती असतात. दिवा लागला आहे म्हणजे १ हे चिन्ह व दिवा मालवला आहे त्यासाठी ० हे चिन्ह वापरणे शक्य झाले म्हणजे दिव्याच्या उघडझापीचे अंकीकरण झाले. इ.स. १६२९ सालीच द्विमान अंकपद्धतीचा शोध लागला. व १९३० साली विजेचे गणकयंत्र आले. त्यात ही गणितीय पद्धत प्रथम वापरली गेली. दुसऱ्या महायुद्धात इलेक्ट्रॉनिक्सचा शोध लागला. द्विमान अंकपद्धती मग संगणक व अन्य विविध उपकरणांत उपयुक्त ठरली. संगणक हा खरे तर गणितात रमलेला; पण या अंकीकरण पद्धतीमुळे तो विविध भाषांना स्वीकारतो. चित्रे स्वीकारतो, मोठाली यंत्रे आपल्या तंत्राने चालवतो. आता आवाज, चित्र, शब्द, साहित्य, संदेश यांचे वहन करायचे तर प्रथम त्यांचे अंकीकरण करावे लागतेच त्यासाठी द्विमान अंकपद्धती वापरावी लागते.

आपण आता दूरध्वनीचे उदाहरण घेऊ. आपण अमेरिकेत जेव्हा दूरध्वनी करतो तेव्हा आपला आवाज अंकीकरणात परिवर्तित होतो. आवाजाचा प्रवास सुरू होण्यासाठी काही आंतरराष्ट्रीय प्रमाणे नियोजित केली आहेत. आपल्या आवाजाच्या नमुन्याचे प्रथम ८ अंकी द्विमान संख्येत रूपांतर होते. ८००० असे आवाजाचे नमुने प्रतिसेकंद अमेरिकेत जाऊन पोचण्याची व्यवस्था यंत्रामार्फत केलेली असते. ८ अंकांचे प्रत्येकी ८००० नमुने म्हणजे प्रत्येक सेकंदाला ६४००० द्विमान अंक ० अगर १ तेथे पोचतात व तेथून बोलणाऱ्या माणसाकडून तेवढेच अंक आपल्या कानावर येतात. मेंदूला हे आवाज अर्थपूर्ण असल्याचे समजते. या सर्व व्यवस्थेत 'चिप्' या लहान पण महत्त्वाच्या शोधाचा कार्यभाग आहे. चिप्चा शोध जॅक किल्बी याने व त्याच सुमारास बॉब नाइस यांनी लावला. दोघांनाही या शोधाचे मालकी हक्क १९६४ साली प्राप्त झाले. हा ८ अंकांचा आवाजाचा नमुना व प्रतिसेकंदाला ८००० नमुने हे प्रत्यक्ष प्रवास करत नाहीत तर यामध्ये असलेली ० आणि १ ही चिन्हे विद्युत-तरंग निर्माण

करतात. हे तरंग योग्य ठिकाणी पोचल्यावर पुन्हा द्विमान पद्धतीतील अंकांत व हे अंक-समुदाय शब्दात परिवर्तित होऊन आपल्याला प्रत्यक्ष बोलणाऱ्या व्यक्तीचाच भास होतो. या गणितीय संकेतामुळे परिवर्तनाची क्रिया दोन्ही टोकांना अगदी स्पष्ट असते. या संप्रेषण प्रणालीसाठी काही आंतरराष्ट्रीय मानके अंतर्भूत असतात. या सर्व परिवर्तनासाठी लागणारा वेळ सेकंदाच्या लहान भागाएवढाच असतो, त्यामुळे दूरध्वनीवर झालेल्या संवादाला नैसर्गिक संवादाचे स्वरूप असते.

आवाज अंकीकरण पद्धतीने जसा परिवर्तित करतात त्याच तत्त्वाने आपण संगणकही वापरत असतो. संगणकाच्या कळफलकावर इंग्रजीतील A, B, C,...Z ही २६ अक्षरे छापलेली असतात. 'A' या अक्षराची कळ दाबली की संगणक - पडद्यावर आपल्याला 'A' हे अक्षर दिसते हे खरेच; पण संगणकाला अक्षरे समजत नाहीत. त्याला फक्त अंक समजतात. त्यामुळे संगणकातील 'A' ही कळ दाबली की आत ११००० ही द्विमान संख्या संगणक लक्षात घेतो. ही संख्या दशमान पद्धतीत २४ आहे. आंतरराष्ट्रीय प्रणालीप्रमाणे ही संख्या 'A' या अक्षरासाठी निश्चित झाली आहे. याच क्रमाने अन्य इंग्रजी अक्षरांसाठी संख्या निश्चित केलेल्या आहेत. याचा अर्थ अक्षरांचे अंकीकरण करता येते. या प्रक्रियेत अक्षरांचे परिवर्तन अंकात होते व अंकांचे पुनःपरिवर्तन अक्षरांत होते. ही पद्धत गणितीय असल्याने त्यात शंका घेण्यासारखी स्थळे आणि प्रसंग निर्माण होत नाहीत. इंग्रजीतील कॅपिटल अक्षरे काढण्यासाठी टाइपरायटरप्रमाणेच फक्त 'शिफ्ट' (shift) ही कळ दाबावी लागेल.

आवाज आणि अक्षरे यांच्या अंकीकरणाची पद्धत वर थोडक्यात मांडली. हीच पद्धत विविध यंत्रांतून – फॅक्स, टेलिप्रिंटर, झेरॉक्स, टेलिग्राम - वापरलेली आहे. तसेच, दूरदर्शन, नभोवाणी, धुलाई मशीन, कॅमेरा, म्युझिक सिस्टीम्स अशासारख्या यंत्रसामुग्रीमध्ये या प्रकारच्या अंकीकरण पद्धतीचा उपयोग करतात. आणखी विविध स्वरूपाची यंत्रे 'डिजिटल' या कुटुंबात सामील होण्याच्या मार्गावर आहेत. (अंकीकरण पद्धतीची सविस्तर माहिती शेवटी दिलेल्या संदर्भ ग्रंथात मिळेल.) अंकीकरणाची ही पद्धत आता ग्रंथ, चित्रे, चलच्चित्रे, सिनेमा, संगीत अशासारख्या अनेक क्षेत्रांत उपयोगात आणली आहे. एखाद्या वस्तूचे अंकीकरण होते याचा अर्थ त्या वस्तूसंबंधी असणारा माहितीचा साठा तयार होतो. हा साठा म्हणजेच ती अंकस्वरूप धारण केलेली परावर्तित वस्तू होय. इंग्रजीमध्ये या सर्व परिवर्तनाला Digitization हा शब्द वापरतात. पण आता काही ठिकाणी Digitalization हा शब्द साहित्यात दिसू लागला आहे. या शब्दाचा अर्थ तोच आहे. पण या अंकीकरण पद्धतीमुळे बरीच यंत्रे बदलली एवढेच नव्हे तर त्यामुळे समाज व संस्कृतीही बदलत चालली आहे हे लक्षात

आले व ही नोंद घेण्यासाठी Digitalization हा शब्द वापरात दिसू लागला. अंकीकरणाचे अनेक उपयोग आता लक्षात आले आहेत. हा अंकीय माहितीचा साठा वाढवता येतो, विस्तारित करता येतो, दूर पाठवता येतो, संचित करता येतो, त्याचा आंदोलन विस्तार बदलता येतो, तो अचूक करता येतो व पुनः परावर्तित करता येतो. अंकीकरणामुळे देशादेशातील अंतर कमी झाले, आर्थिक शक्तींसाठी नवीन दालने उघडली व समाजपरिवर्तनाला सुरवात झाली. एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की अंकीकरणाची ही क्रांती गेल्या १० वर्षांतील आहे. एकविसाव्या शतकात मनुष्यमात्राला ही क्रांती कोठे घेऊन जाऊ शकेल, याचा अदमास आपण करू शकतो.

भाषेच्या संदर्भात अंकीकरणाच्या शोधाने आता क्रांतीचे स्वरूप घेतले आहे. उदाहरण द्यायचे तर ब्रिटानिका एन्साक्लोपीडीया या कोशाचे घेता येईल. या कोशाचे ३३ खंड, प्रत्येकी सुमारे १००० पृष्ठांचे आहेत. हे ग्रंथ डेमी चतुश्पत्री पृष्ठाच्या आकारावर (९" × ११.५") छापलेले आहेत. या खंडांचे एकूण वजन १०० किलोच्या आसपास आहे व किंमत १५०० डॉलर्स म्हणजे सुमारे ६८००० रुपये आहे. या सर्व खंडांचे आता अंकीकरण झाले असून ते बाजारात एका सीडीवर उपलब्ध आहे. ही सीडी १० ग्रॅम वजनाची असून तिची बाजारातील किंमत ९०० रु. एवढी आहे. ही सीडी वापरण्यासाठी संगणक लागेल. हे उदाहरण बरेच बोलके आहे. हे खंड आता संगणकावर वाचता येतात, त्यांचे मुद्रण स्पष्ट व रेखीव आहे. त्यातील सर्व फोटो, चित्रे, नकाशे, तक्ते संगणकावर स्पष्ट दिसतात. या सोयीमुळे हे ग्रंथ आता शेकडो वर्षे टिकतील. फक्त काही काळाने फारतर तबकडी बदलावी लागेल. हे कोश शेकडो वर्षांनंतर वाचता येतील. त्यातील भाषा स्थिर असल्यामुळे काळाच्या ओघात होणारे भाषेतील बदल सीमित करता येतील किंवा त्या त्या वेळच्या बदललेल्या भाषेत परावर्तित करता येतील. कालौघात अंक बदलत नाहीत. आज जगातील सर्व महत्त्वाच्या लेखकांच्या वाङ्मयाचे अंकीकरण झाले आहे. लक्षावधी ग्रंथांची वाचनालये आता अंकीकरण पद्धतीत परावर्तित झालेली आहेत. वाङ्मय, साहित्य व त्यामुळे संस्कृती जतन करण्यासाठी एक नवीन परिमाण लाभले आहे. अंकीकरणातून आवाज, रंग, चित्रे यांचे माहिती-साठ्यात परावर्तन करता येते, त्यामुळे मान्यवर कलाकारांची निर्मिती, जिला फार मोठे सांस्कृतिक व ऐतिहासिक मूल्य असते, आता शेकडो वर्षे टिकवण्याची सोय झाली आहे.

वर नोंदलेली क्रांती अंकीकरणातून झाली. आता ग्रंथांचे अंकीकरण झपाट्याने उरकण्यासाठी मोठी यंत्रे निर्माण झाली आहेत. हे यंत्र अंकीकरणासाठी ग्रंथ स्वीकारल्यावर त्यातील अक्षरे, चित्रे पाहते, पाने उलटते व त्यातील सर्व माहितीचे

अंकीकरण करू शकते. एका दिवसात वाचनालयातील ५००च्या वर ग्रंथांचे अंकीकरण करण्याची क्षमता त्यात आहे. हैदराबाद येथील Indian Institute of Information Technology या संस्थेत असे अंकीकरण करण्याचे यंत्र, मला पाहावयास मिळाले. ही संस्था इंग्रजी भाषेतील ग्रंथांचे अंकीकरण करण्याची कामे स्वीकारते. येथे इंग्रजी भाषेतील ग्रंथ असले पाहिजेत ही अट लक्षात घेणे गरजेचे आहे.

इंग्रजी भाषा रोमन लिपीत लिहिली जाते तसे पाहिले तर रोमन लिपीत लिहिल्या जाणाऱ्या भाषांची संख्या फार मोठी आहे. युरोपातील सर्व भाषा थोड्या फार फरकाने या लिपीचा उपयोग करतात. या लिपीतील सर्व भाषांना आता अंकीकरण शोधाचा लाभ घेता येईल व सर्व ग्रंथ परावर्तित करून सुरक्षित करता येतील. रोमन लिपीत २६ अक्षरे आहेत. त्यातून सर्व शब्द, वाक्ये पूर्ण करता येतात. या भाषा उच्चाराप्रमाणे लेखन करीत नाहीत. त्यामुळे कमी अक्षरचिन्हे पुरी पडतात. मग प्रत्येक शब्दाचे स्पेलिंग पाठ करावे लागते व ते लक्षात ठेवावे लागते. पण आता या अडचणींवर मात करता येते; कारण या भाषांचे शब्दकोश संगणकाच्या स्मरण-केंद्रात साठवता येतात, नाहीतर तबकडीवर (CD) नोंदवता येतात. आज रोमन लिपीतील संगणकावर मुद्रणासाठी सुमारे १०५ चिन्हे आवश्यक आहेत. त्यामुळे रोमन लिपीतील मुद्रण सोपे आणि स्वस्त आहे. या सुविधांमुळे अंकीकरण व्यवस्था प्रत्यक्षात आणणे या भाषांना व त्या भाषा वापरणाऱ्या देशांना सोपे जात आहे.

आशिया खंडातील भाषांचा विचार केला तर या भाषांत लेखनासाठी विविध लिपी वापरतात. चीन व जपानमध्ये चित्रलिपीत भाषा लिहितात. भारतात बऱ्याच भाषा देवनागरी व तत्स्वरूप लिपी वापरतात. दक्षिणेकडील राज्यांत तर चार वेगवेगळ्या लिपी उपस्थित आहेत. बहुतेक मुस्लिम राष्ट्रे अरेबिक लिपी वापरताना दिसतात. अंकीकरण व्यवस्थेसाठी या भाषांसमोर अनेक अडचणी आहेत.

मराठी भाषा देवनागरीतून लिहितात. या लिपीत १२ स्वर आणि ३६ व्यंजने आहेत. आपण लेखन उच्चारानुसार करतो त्यामुळे ही ४८ अक्षरे पुरी पडत नाहीत. प्रत्येक व्यंजनाच्या मग बाराखड्या तयार होतात. या सर्व चिन्हांनीही आपले भागत नाही. म्हणून मग आपण जोडाक्षरे घेतो. स्पंदन, स्वागत, स्वीकृत... अशा शब्दांतील जोडाक्षरांत दोन अक्षरचिन्हांची जोड आहे. पण 'उत्कृष्ट' या शब्दात त्, क्, ऋ अशी तीन अक्षरे आहेत, तर 'धाष्ट्र्याने' शब्दात र्, ष्, ट्, य्, आ अशी पाच चिन्हे आहेत.

लेखन उच्चाराप्रमाणे करण्यासाठी मराठी लेखनाला किती चिन्हांची गरज भासते हे त्यामुळे लक्षात येते. या सर्व चिन्हांचे अंकीकरण करणे हा एक अवघड प्रयोग



अनुक्रमणिका

आहे. तरी यातूनही मार्ग निघाला. अखेरीला एवढी सर्व प्रकारची जोडाक्षरे प्रत्यक्ष लेखनात दिसत नाहीत. त्यामुळे मराठी संगणक तंत्रज्ञानी ३५० चिन्हे लेखनासाठी नोंदवली व त्यांच्या आधारे मराठी अंकीकरणाचा प्रश्न मार्गी लावला. रोमन लिपीच्या तुलनेत ही संख्या तिपटीपेक्षा जास्त आहे. मराठीत संगणकीय मुद्रणासाठी वेळ आणि खर्च जास्त करावा लागतो. आशियातील सर्वच भाषांना अंकीकरण-प्रक्रिया अवघड जाते असे लक्षात येते.

अंकीकरण शोधामुळे जगातील काही भाषांना जसा फायदा होणार आहे तसा काही भाषांना अडचणी येणार आहेत. देवनागरी लिपीत लिहिलेली मराठी या निमित्ताने आणखी एका संकटाला सामोरे जात आहे. या संकटातून बाहेर पडण्यासाठी मराठी आता रोमन लिपीत लिहावी असे म.ना. गोगटे सुचवतात. गोव्यात पोर्तुगीत राजवटीत कोकणी भाषा रोमन लिपीत लिहित असत. अजूनही एक मोठा गट रोमन लिपीचा आग्रह धरणारा आहे. पण असे परिवर्तन घडणे केवळ अशक्य आहे. आता बऱ्याच संगणक-संशोधन संस्थांमध्ये भारतीय भाषांसंबंधी - संस्कृतसह - काम चालते. ही नवीन तंत्रज्ञ मंडळी नवीन मार्ग शोधून काढतील (सेंगल, २००३)

एके काळी व्याकरण, सौंदर्य, नवनिर्मिती संरक्षण या भाषेच्या घटकांशी समाजातील एक लहान साहित्यिक गट संबंधित होता. इतरांना भाषेचे फारसे सोयरसुतक नव्हते. गेल्या १५० वर्षात लोकशाही - मूल्याच्या प्रस्थापनामुळे भाषेचा गुरुत्वमध्य सरकला आहे व ती जबाबदारी आता सर्वांचीच झाली आहे. गेल्या २५-३० वर्षात हाच गुरुत्वमध्य आणखी वेगळ्या दिशेला वळत आहे. भाषेत कवी, लेखक, विचारवंत जसे परिवर्तन करतात तसेच वैज्ञानिकही या विषयाला वेगळी वळणे देण्यास तत्पर झाले आहेत. जग लहान झाल्यामुळे भाषेच्या प्रगतीला आता आंतरराष्ट्रीय परिमाणे आवश्यक झाली आहेत. यासाठी संस्कृत भाषेसंबंधी एक संदर्भ (जेरार्ड ह्युएट, समाविष्ट सेंगल, २००३) दिला आहे. मराठी भाषा असे नवीन आवर्त पार पाडेल अशी आपण आशा करू या.

**संदर्भ :** आपटे, आल्हाद १९९८. 'संदेशायन.' ग्रंथाली प्रकाशन, मुंबई

सेंगल, राजीव, एस्.एम्.बेन्द्रे व उदय नारायण सिंग (सं.) २००३ 'रीसेंट ॲड्व्हान्सेस् इन नॅचरल लँग्वेज् प्रोसेसिंग', 'नॅचरल लँग्वेज प्रोसेसिंग ॲसोसिएशन ऑफ इंडिया', हैदराबाद आणि 'सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्विजिज्', मैसूर. [याच ग्रंथात जेरार्ड घुएट यांचा 'टोअर्डस् कॉम्प्युटेशनल प्रोसेसिंग ऑफ संस्कृत' हा लेख (पृ. ४० ते ४८) समाविष्ट आहे.] ■

१२, प्रेसी बिल्डिंग, मळा, पणजी (४०३००१), गोवा (०८३२) २२२५८१६

# वैदू समाजाचा भाषिक व्यवहार

शिवाजी विष्णू पाटील

वैदू ही एक अमराठी जमात आहे. भारताच्या दक्षिणेकडील द्रविड भाषावंशातील तेलुगु भाषिक प्रदेशातून येऊन सुमारे शंभर वर्षांपूर्वी ही जमात व्यवसायाच्या निमित्ताने भटकंती करीत होती. भारत स्वतंत्र होण्याच्या दरम्यान ती महाराष्ट्रातील शहरी भागात स्थिर होत गेल्याचे दिसून येईल. सातारा शहरात कामाटीपुरा, जगतापवाडी इ० ठिकाणी तात्पुरत्या स्वरूपाची किंवा पक्की घरे बांधून वैदू समाज राहिलेला दिसतो. त्यांनी गावोगाव फिरून औषधे विकण्याचा पारंपरिक व्यवसाय सध्या बदललेला आहे. शहरी वातावरणात स्वत:ला जमवून घेऊन स्वत:च्या पायावर उभे राहण्यासाठी ते छोटे छोटे उद्योग करताना दिसून येतात. पूर्वी देवगड, मलकापूर, विशाळगड, जोतिबा, महाबळेश्वर, पोलादपूर, महाड, दिघंची इ० ठिकाणी डोंगरात व जंगलात फिरून औषधी वनस्पती संकलन करून वैदू-व्यवसाय करण्याचे बंद झालेले आहे. त्यांची गुडेले, शिवररोडे, पिडरलरोडे, गुडेइले इ० आडनावे बदललेली आहेत. पोषाखही बदललेला आहे. एकूणच हा समाज मराठी मातीशी अतूट नाते प्रस्थापित करताना दिसतो. वैदू समाज व्यवहारासाठी मराठी बोलीचा उपयोग करीत असला तरी त्यांची कुटुंबातील बोलीभाषा तेलुगु आहे. परंतु या तेलुगु बोलीत कानडी व मराठी यांची सरमिसळही काही प्रमाणात दिसून येते.

हे लोक वडाला रामझाड असे मराठी बोलीत म्हणतात, तर तेलुगु बोलीत वरेयशट्टू असा शब्दप्रयोग आहे. शट्टू हा भाषिक संकेत कोणत्याही झाडाला वापरतात. वरेयशट्टुचे रक्तशट्टू व मरीशट्टू असे दोन प्रकार मानलेले आहेत. ज्या वडाच्या झाडाला काप मारला असता रक्तासारखा द्रव बाहेर येतो, त्यास रक्तशट्टू म्हणतात. ह्याच्या सालीची पूड जखमेसाठी वापरली जात असे. मरीशट्टूचा औषधासाठी फारसा उपयोग केला जात नव्हता.

झाड व फळे विषयक वापरले जाणारे भाषिक संकेत :

बाभूळ-तुम्मा. आंबा-मामडकाई. केळ-बालपंडु. बोर-बोरयेपंडु. आवळा-तिनेकाई. जांभूळ-नल्लाइत्तु. साग-तुम्मसाल. चिंच-शंतकाई. फणस-व्यद्दाकाई. बांबू-बांबूरयेदुरकट्टे (कट्टे = काठी).पेरू-पेरेपंडु. निवडुंग-निडीपंडु. सुपारी-वाकाबेडु. नारळ-टंकाई. करवंद-नल्लाकरवंद. याशिवाय कलिंगड, मोसंबे, संत्रे, सीताफळ, रामफळ, पपई, डाळिंब, इ०ना मराठी बोलीतीलच नावे आढळतात.

**भाजीपालाविषयक :** भोपळा-मोंगडीकाई. भेंडी-भेंडकाई. वांगे-वंगाई. गोवारी-शेळकाई. कारले-शेदुकाई. टोमॅटो-टमाटु. घेवडा-घुमडीकाई. मुळा-उलमागड्डु. कांदा-उल्लेगड्डु. काकडी-ककडीकाई. मिरची-मोरकाई. कारले-शेदुकई.

**वनस्पतीविषयक :** बुंधा-बुडका. शेंडा-शेंड. कोंभ-वच्चनादे. फळ-पंडु. मूळ-न्यानेकेपिनादु. फांदी-शट्टुयेलु. बी-भूशंगु, काटा-मुल्लु. लाकूड-कट्लु.

याशिवाय रताळे, गाजर, लसूण, कांदा, मुळा, इ०ची भूमीत वाढ होत असल्यामुळे त्यांना 'भूमिकाई' असे संबोधतात. कोणत्याही झाडाच्या पानास 'आकु' म्हणतात.

**संख्यावाचक शब्द :** एक-वगटी. दोन-रोंडु. तीन-मुडु. चार-नालगु. पाच-आयदु. सहा-आरु. सात-येळु. आठ-येनमेदु. नऊ-तुम्मेदु. दहा-पदई. वीस-येरवेई. तीस-मुप्पई. चाळीस-नलपाई. शंभर-नोरु. हजार-सावेरु. लाख-नोरुसावेरु.

**आप्तसंबंधवाचक शब्द :**

आई-आम्मा. बाप-आप्पा. चुलता-शीनाबा. बहीण-आक्का. भाऊ-तमोडु. भावजय-वदेनी. बायको-पेन्लामु. पुतण्या-तमडुकडकलु. सासू-मामी. सासरा-मामा. जावई-आलुडु.

या समाजात यल्लमा ही कुलदेवता मानली जाते. यल्लमासाठी 'दुर्गादेवी', 'दुर्गामाता', 'जगदंबा' अशीही रूपे वापरात आहेत. याशिवाय कानडीत येरीकेरी व तेलुगु बोलीतील प्यदादाउड हे शब्द आढळतात.

अमराठी वैदू समाज तेलुगु बोलीचा आपल्या कुटुंबापुरता मर्यादित उपयोग करताना दिसतो. त्यांनी तेलुगुविषयीचा स्वाभिमान जागृत ठेवलेला आहे. मात्र घराबाहेर वेगवेगळ्या उद्योगांशी संपर्क येत असल्यामुळे ते मराठी बोलीशी जमवून घेताना दिसतात. त्यामुळे त्यांची मराठी बोली विस्तार पावत आहे. उदरनिर्वाहासाठी आदानप्रदानाची भाषा होत आहे. नवनवीन शब्द आत्मसात केले जात आहेत. वैदूंची मराठी बोली ही परिस्थितीजन्य कारणाने उद्‌भवलेली आहे. परंतु मराठी प्रमाणभाषेपासून शेकडो मैल दूर असल्यामुळे अलीकडच्या पिढीला शिक्षण घेताना भाषिक अडसराला तोंड द्यावे लागत आहे. सध्या शिक्षण संस्थांत प्राथमिक शिक्षक, शिपाई या पदावर व अन्य सहकारी संस्था, खासगी व्यवसायात काम करणाऱ्यांची संख्या वाढत असल्यामुळे काहींनी मूळच्या तेलुगु बोलीकडे पाठ फिरविली आहे. कदाचित एखाद्या-दुसऱ्या पिढीनंतर तेलुगूचे पूर्ण उच्चाटन होण्याचा संभव आहे. परंतु मूळ तेलुगु भाषा टाकून दिली तरी अन्य भाषा-स्वीकृतीच्या वेळी स्वत:च्या मूळ भाषेच्या उच्चाराविषयक सवयी त्यांना टाकून देता येत नाहीत. तेलुगु भाषेतील आवश्यक

संकेत व अंगवळणी पडलेली व्याकरणविषयक वैशिष्ट्ये त्यांच्या वाणीवर प्रभाव गाजवीत राहतात. म्हणून त्यांच्या बोलीचा भाषिक अभ्यास मराठीच्या संदर्भात महत्त्वाचा ठरू शकेल. ■

**प्रपाठक, छत्रपती शिवाजी कॉलेज, सातारा ४१५००१. फोन ०२१६२/२२२३९१**

## कानी (न) पडलेला संवाद

– एवढं ओरडायला काय झालं ? (मला कांय ऐकू येत नाही ?)
– मग काय करू ? (हळू सांगितलं त्याचा काहीच उपयोग झाला नाही.)

●●●

– लॉण्ड्रीतून कपडे आणले का माझे ? (बहुधा नक्कीच विसरलेले असणार.)
– आणले की ! (नोकर मिळालाय ना बिनपगारी.)
– हो का ? (नशीबच म्हणायचं)

●●●

– मुलांनी घर डोक्यावर घेतलंत नुसतं ! जरा त्यांना गप्प बसवलं तर ? (पोरांना लाडावून ठेवलंय नुसतं !)
– मुलं तर मजेत आहेत की, झालंच तर ती थोड्या वेळात झोपायला जातीलच ना. (झाली तक्रार सुरू ! कधी थांबतच नाही.)
– हां, मग मी त्यांना झोपवू का ? (माझं कुठलंच म्हणणं पटायचं नाही, गोष्टी आपल्याच हातात घ्याव्या हे बरं.)
– नको, नको, झोपवीन मी लगेचच. (हल्ली भडकूपणा वाढत चाललाय. पोरांना मारीलबिरील, आपण पडतं घ्यावं हे बरं.)

वाचकांसाठी स्वाध्याय : रिकाम्या जागा भरा ‘तो’ आणि ‘ती’ योग्य ठिकाणी घालून. असे आणखी काही संवाद तुमच्या कानी न पडलेले आहेत का ? (मात्र रिकाम्या जागांतून ‘तो’, ‘ती’ आणि ‘ते’ घालायची तरतूद हवी.)

– प्रेषक : **डॉ. अशोक रा. केळकर**








अनुक्रमणिका

# तुकाराम आणि मर्ढेकर : अतींद्रिय अनुभवाची आस

डॉ. माणिक धनपलवार

बा.सी. मर्ढेकर हे नवकवी म्हणून मान्यता पावले. सांकेतिकतेची रूढ चाकोरी सोडून कविता या वाङ्मयप्रकाराला त्यांनी वेगळा आयाम दिला, असे मानले जाते. साहित्य-शास्त्राच्या क्षेत्रातही अनुभूतिविषयक सिद्धान्त (लेखनपूर्व व लेखनगर्भ आत्मनिष्ठा) मांडून त्यांनी एकेकाळी अनेक साहित्यिकांना वेगळा विचार करण्यास भाग पाडले. मर्ढेकरांनी सविस्तर व सूक्ष्मपणे मांडलेल्या 'आत्मनिष्ठा' या सिद्धान्ताचा केवळ अनुभूतीच्या संदर्भातच विचार झाला; पण त्यांनी त्याला प्राणभूत असा जो तात्त्विक पाया दिला, त्याकडे अभ्यासकांचे फारसे लक्ष गेले नाही. त्या मुद्याकडे वळण्यापूर्वी त्यांनी मांडलेली 'आत्मनिष्ठा' ही संकल्पना काय आहे, ते पाहू. [यासंबंधीचा ऊहापोह माझ्या अन्य एका लेखात ('तुकाराम आणि मर्ढेकर : प्रवृत्तिसाम्य व प्रभाव'- ''तंजावर आणि महाराष्ट्र : साहित्य व शोध'' या ग्रंथात समाविष्ट) आला आहे.]

'आत्मनिष्ठा' ही संकल्पना तशी नवी नाही. तुकारामांचे सगळे कवित्व या जाणिवेतूनच निर्माण झाले. मर्ढेकरांनी प्रतिपादिलेल्या 'लेखनपूर्व व लेखनगर्भ आत्मनिष्ठा' या सिद्धान्ताचा उगम तुकारामात आहे. मर्ढेकरांनी उपयोजिलेला 'आत्मनिष्ठा' हा बीजशब्दच मूळ तुकारामांचा असून मर्ढेकरांनी त्याच अर्थाने तो स्वीकारला आहे. उत्कट अनुभूतीची परिणती अंतिम सत्याच्या शोधार्थ व्हावी, हे त्यांनी आग्रहाने प्रतिपादिले. केवळ अनुभूतीच्या जोरावर साहित्याला महात्मता प्राप्त होत नाही, यावर त्यांचा कटाक्ष होता. मर्ढेकरांनी 'परमशक्तीचा' ध्यास घेतला होता, असे त्यांचे चरित्रकार सांगतात. त्यांच्या मनाची आध्यात्मिक घडण सिद्ध होण्यात संत-साहित्याचा फार मोठा वाटा आहे. रामदासी संप्रदाय तर त्यांच्या कुळात चालत आलेला होता. ज्ञानेश्वर, तुकाराम त्यांनी अभ्यासलेला होता. त्यातही तुकाराम हा त्यांच्या खास चिंतनाचा व जिव्हाळ्याचा विषय होता, असे दिसते. रात्रंदिवस युद्धाचा प्रसंग अनुभवणाऱ्या व आपल्या ध्येयसिद्धीसाठी संसाराला आग लावून त्याकडे परत न पाहणाऱ्या तुकारामांच्या व्यक्तिमत्त्वाचा व त्यांच्या अभंगसृष्टीचा मर्ढेकरांच्या मनावर सखोल परिणाम उमटला होता. मनाला दुःखाचे चटके बसले की, ते अतींद्रिय अनुभवाला सन्मुख होतात. 'पोळू दे आतून तीतें । या अतींद्रियार्थ आचे' असे मर्ढेकर त्यामुळेच म्हणतात. त्यांच्या अध्यात्मप्रवण वृत्तीमुळे साहित्यनिर्मितीचे फलित

'विश्वघटनेच्या तत्त्वाशी टक्कर' घेण्यात झाले पाहिजे अशी त्यांची लेखकांकडून अपेक्षा आहे. साहित्यिकांना 'विश्वाचे गुप्त रहस्य' जाणून घेण्याची आंतरिक ओढ असली पाहिजे.

मर्ढेकरांनी आपल्या काव्यातून मनावी मूल्यांना प्रमाण मानले आहे. आजच्या मूल्यहीन, नि:सत्त्व जीवनचर्येविषयी त्यांनी प्रचंड उबग व तिटकारा व्यक्त केला आहे. मनुष्यत्वाला आलेल्या हिडीस, ओंगळ स्वरूपाचे चित्रण करणाऱ्या त्यांच्या कविता मानवी जीवनाच्या अस्तित्व-कारणाकडे अंगुलीनिर्देश करणाऱ्या ठरतात. 'या गंगेमधि...' ही मर्ढेकरांची नेहमी ताजी वाटणारी कविता. सकाळच्या निसर्गरम्य, नीरव वातावरणात पुण्यतोया गंगेचे दर्शन घेताना त्यांचे पार्थिवतेचे बंध गळून पडतात. त्यांच्या मनाला एक नि:शब्द, नीरव, अनामिक अशी शांतता व्यापून राहते. बुद्धगयेचा पिवळा वारा अंगाला अलगद स्पर्श करून जातो. आत्मभान विसरले जाते. 'अद्वयाब्जिनी' जणू विकास पावते. गंगाजळ व आकाश यांचे एकरूपत्व अनुभवास येऊन मन शुभाशुभाच्या अतीत होऊन जाते. द्वैताच्या भिंती कोसळून पडतात. एकाच एका सर्वव्यापी सत्याची जणू प्रचीती येते. यामुळे ते सहज लिहून जातात-

*ह्या गंगेमधि गगन वितळले*
*शुभाशुभाचा फिटे किनारा*

ही अद्वैतप्रतीती म्हणजे अतींद्रिय अनुभवाचा संकेतच होय. मर्ढेकरांच्या या ओळी वाचताना कुठे तरी तुकारामांच्या पंक्ती डोळ्यांपुढे येतात. तुकाराम आत्मज्ञानप्राप्तीचा सुखोल्लास वर्णन करताना असेच सांगतात-

*नभोमय जाले जळ । एकी सकळ हरपले - क्र. ४५१*
*अवघा निवारला शीण । शुभाअशुभाचा - क्र. ४०६*

या दोन्ही कवींतील हे शब्दसाम्य/प्रतिमासाम्य लक्षणीय आहे. जलाशय व आकाश यांचे एकरूपत्व आणि शुभाशुभाचे काठ विरघळून जाणे, हे साम्य केवळ योगायोगानेच आले असे नाही, तर मर्ढेकरांवरील तुकारामांच्या सखोल प्रभावाचे ते द्योतक होय. दोन्ही कल्पनांचा उगम समान अनुभूतीच्या पोटी आहे, हेही लक्षात घेण्यासारखे आहे. (येथे मी अध्यात्मात शिरत नाही). तुकाराम म्हणतात की, मी काव्य निर्माण करतो; पण सत्याची प्रतीती आली नाही तर त्याचा काय उपयोग ? मर्ढेकरही तेच सांगतात - केवळ सखोल अनुभूतीची प्रतीती देणारे काव्य शेवटी अंतिम सत्याला कुठे तरी स्पर्श करणारे असावे. दोन्हीतील हे मूलभूत साम्य विचारात घेण्यासारखे आहे.

तुकाराम आणि मर्ढेकर यांच्या काव्यातील साम्यस्थळे न्याहाळताना सहज लक्षात










येईल की, मर्ढेकर तुकारामांच्या ध्येयनिष्ठ, मूल्यवादी, वैराग्यशील व पारदर्शी व्यक्तित्वाने व हृदयाला भिडणाऱ्या उत्कट अभंगवाणीने भारलेले होते. त्यांची साहित्य-विषयक महात्मतेची संकल्पना तुकारामांच्या जीवनावर व त्यांच्या काव्यनिर्मितीवर बेतलेली आहे. ती संकल्पना तीन पदरी आहे - लेखनपूर्व आत्मनिष्ठा, लेखनगर्भ आत्मनिष्ठा व अंतिम सत्याचा ध्यास. या तिन्हींचा आढळ त्यांना तुकारामात झाला. अन्य आनुषंगिक गोष्टीही तुकारामात आढळतात. या महात्मतेच्या निकषावर कुठलाही आधुनिक मराठी साहित्यिक उतरत नाही, हे मर्ढेकरांनी मोकळेपणे सांगून टाकले आहे. कुणा पाश्चात्य लेखकांनाही त्यांनी हे श्रेय दिले नाही. महात्मतेचे तात्त्विक विवेचन करून ते मोकळे झाले. मर्ढेकरांचे तळमळीचे आवेशपूर्ण लेखन, त्यातून त्यांनी व्यक्त केलेल्या अपेक्षा, तुकारामांची प्रतिके, प्रतिमा, शब्दकळा व विचारसरणी यांचा अवलंब - या सर्वांतून महात्मतेचे मानकरी म्हणून त्यांना तुकाराम अभिप्रेत आहेत, असा निष्कर्ष काढावासा वाटतो. मर्ढेकरांनीही याला आक्षेप घेतला असता असे वाटत नाही. (अर्थात त्यांच्यापुढे या व्यतिरिक्त अन्य कवि-लेखकही असू शकतील.)

**टीप :** या लेखातील अभंगक्रमांक भालचंद्र नेमाडे संपादित ''तुकाराम गाथा''(निवडक अभंग)यानुसार. ■

३-४-१०१३/१९, बरकतपुरा, हैदराबाद ५०००२७, दूरध्वनी : (०४०) २७५६१२८४

माणूस किती भाषा आत्मसात करू शकतो, यावर तशी मर्यादा नाही. आपला मेंदू निरनिराळ्या भाषा शिकण्याची आणि त्यांचं ज्ञान व्यवस्थित, साठवण्याची, गरजेनुसार ते उपलब्ध करून देण्याची क्षमता बाळगून असतो. आपण कोणती भाषा शिकतो, किंवा वापरतो, त्याबाबतचं नियंत्रण मेंदूच्या डाव्या कानशिला-जवळच्या एका भागाकडून केलं जातं. याला 'ब्रोकाचा मेंदू' किंवा 'ब्रोकाचं क्षेत्र' असं म्हटलं जातं.

उत्क्रांतीच्या काळात भाषेचा वापर करण्यासाठी काही शारीरिक बदल व्हावे लागले. उदाहरणार्थ, आपल्या गळ्यात असलेल्या स्वरयंत्राचा उदय व्हावा लागला. त्याच्या निगडित हाडांचा, स्नायूंचा उदय व्हावा लागला. ती अंगं जशी शरीरात विकास पावली, तसा त्यांचं नियंत्रण करणाऱ्या मेंदूच्या विभागांचाही विकास व्हायला लागला.

**डॉ. बाळ फोंडके,**
'भाषाकोश', विज्ञान प्रपंच, २००५

# संवाद

शरदिनी मोहिते

जन्म घेत असतानाच्या जोरदार ललकारीपासून 'टॅ हॅ.... टॅ हॅ...' पासून सुरू झालेलं बाळाचं बोलणं जेव्हा जाणीवपूर्वक समजून, लक्ष वेधूनं घेण्यासाठी रडण्याचं रूप धारण करतं, त्याच वेळी समाधानानं हसणं - कधी कधी आवाज करतही हसणं - खिडकीतून दिसणाऱ्या झाडाच्या फांदीवर बसलेल्या पक्ष्याचा मधुर आवाज ऐकून त्याची चक्क नक्कल करणं, काही तरी सांगू पाहाणं, म्हणजेच जमेल तसा संवाद करणं, अशा वळणानं जात जात प्रत्यक्ष बोलीच्या दाराशी आल्यानंतर 'आई' 'बाबा' 'ममा' 'ताई' 'दादा' यांना हाका मारण्याचा प्रयत्न सुरू होतो...

आमच्या मिनू बाळानं अल्पाक्षरीमधे बोलायला सुरुवात केली... 'मा' 'ता' 'बा'... तो 'बा' म्हणत असताना तर एखादा ग्रामीण कथाकार 'बोलल्या'चा भास व्हायचा! पुढे मग 'ममा' 'बाबा'ही सुरू झालं. पण आश्चर्य म्हणजे याच्याही आधी त्यानं कुठलाही 'थांबा' न शोधता सरळ 'आज्जी' म्हटलं; आणि त्याहून विशेष म्हणजे 'आत्ता' (= आत्या) ही म्हणायला सुरुवात केलेली होती !...

अजिबात बोबडेपणा नाही...

...एकदा बोलायला येतंय म्हटल्यावर, तो अगदी जिव्हाळ्यानं आणि संपूर्ण आत्मविश्वासानं अख्खी वाक्यं सटासट फेकत राहतो... आपण एवढं काही बोलतोय, आणि हिला कसं ते कळत नाही, असा स्पष्ट भाव त्याच्या चेहऱ्यावर उमटलेला असतो... हा बोलतोय खरं पण त्याला काय सांगायचंय याचा आपल्याला बोध होत नाही, त्याला काही तरी सांगायचं असतं हे मात्र निश्चित आणि त्याचा उत्साह, त्याची उत्सुकता स्पष्टच दिसत असल्यामुळे, आपल्याला त्या वेळी काही समजलं नाही तरी त्याला वाईट वाटू नये त्याचा हिरमोड होऊ नये म्हणून 'असं ?'... 'हो ?'... असं म्हणावं, तेव्हा तोही मग 'हा !' असं म्हणतो. ...त्याला वाटतं, 'आपण म्हटलं ते पटलं वाटतं...' असा सगळा घोटाळा कधीकधी होऊन जातो, आणि त्या त्या वेळचं ते ते सांगणं पार निसटून गेलेलं असतं खरं...

आणि हे सर्व चालू असताना नजरेची देखील भाषा चालू असतेच... टी.व्ही.वर

आम्हा दोघांच्या पसंतीचं, ओळखीचं गाणं लागलं म्हणजे त्याच्या डोळ्यांत उमटणारी दाद देणारी आनंदी चमक मोठ-मोठ्यांनी दिलेल्या 'वा !'... 'वाहवा !'च्याच तोडीची असते...

अगदी आत्ता आत्ताची गोष्ट. मी छान काहीतरी वाचत पडले होते. आणि पलीकडच्या खोलीतून बाळाच्या हाकांचा कालवा ऐकू आला. मी माझ्या वाचनात दंग असल्यानं काय चाललंय हे मात्र कळलं नाही. कल्ला आणि हाकाटी चालूच राहिल्यामुळे मी वाचन बाजूला ठेवून काय चाललंय ते बघायला गेले, तर आमची चिमणी फौज माझ्याकडेच तरातरा यायला निघालेली दिसली. हे छोटं पिल्लू चांगलंच वैतागलेलं दिसलं... त्याच्या तायांनी सांगितलं की एक छान चिमणी खिडकीत आली होती ती पहायला तो मला बोलवत होता; त्यानं हाका मारल्या, तरी मी गेले नाही म्हणून तो चिडला होता ! मी नेहमीच त्याला चिऊताई, हम्मा, भू भू वगैरे दाखवते. अचानक चिऊताई दिसल्यावर त्यालाही वाटलं की आपणही आज्जीला चिऊताई दाखवावी. म्हणून तो म्हणत होता 'आज्जी तिऊतिऊ...'

या बाळानं एकदा माझी चांगलीच जिरवली ! मी धुतलेले कपडे नेहमी स्टँडवरती वाळत घालते. याला लागला नाद कपडे ओढून काढायचा. पांढऱ्या गोळ्यांची लव्हेंडर साडी ओढायला त्याला फारच आवडे. मी काय केलं, कपड्यांचे छान रंगाचे देखणे चिमटे आणले आणि त्यातले दोन साड्यांना लावले. पठ्ठ्यानं दोनच मिनिटात ओळखलं काय ते, आणि शांतपणे चिमटा काढून माझ्या हातात ठेवून दिला !.. माझ्याकडे खोचकपणे पाहात !! हे मूक भाष्य वर्ष-सव्वावर्षाच्या बाळानं करावं ही खरोखरच नवलाची गोष्ट नाही का ?...

मुलांच्या वागण्या-बोलण्यातलं नवल केव्हा प्रकटेल आणि थक्क करून सोडेल याचा नियम नाही. बाळाच्याच मोठ्या ताईची गोष्ट... तिचं वय तेव्हा असेल सहा वर्षाचं... तिला घेऊन मी आमच्या आवडीच्या 'कल्पना'त गेले होते. त्या वेळी तिचं बोलणं आणि वागणं अक्षरशः थक्क करणारं असं झालं. 'कल्पना'त गेल्यावर डोसा तर खायचा. पण ती कसला घेणार, साधा की मसाला, ह्यासाठी मी विचारलं असताना ती म्हणाली, ''थांब ! मी 'आत' विचारून सांगते.''

''म्हणजे काय ?'' असं मी विचारेपर्यंत ती डोळे मिटून बसलेली दिसली... थोड्या वेळानं डोळे उघडून ती म्हणाली, ''नाही... मेंदू ऐकायला तयार नाही... काही उत्तरच देत नाही !''

आता एवढ्याशा चिमुरडीनं आपल्या अंतर्मनाशी संवाद साधावा, आणि ते स्पष्टपणे सांगावं ही केवढी कमाल !

मुलांचे हे अशा वेगवेगळ्या तऱ्हांचे संवाद खरोखरच वेधक असतात.

एक गमतीची गोष्ट अशी की, मुलंमुलंच जेव्हा बोलतात तेव्हा त्यांना, एकमेकांचं बोललेलं समजायला सोपं जात असावं असं वाटतं... कारण एक बाळी काय बोलली, काय म्हणाली हे जर आपल्या ध्यानात आलं नाही, तर तिथेच ऐकत असलेलं दुसरं बाळ आपल्याला ते समजावून सांगतं !... त्यांच्या विश्वातले त्यांचे आडाखे त्यांच्या जाणिवा त्यांनाच माहीत. कारण वय वाढत गेल्यावर आपण त्या विश्वापासून बरेच दूर गेलेलो असतो. मुलांचा हा उत्साह, ही कळकळ आपल्याला त्या विश्वाचं दार पुन: किलकिलवते. आणि त्यांचा आपल्याशी, आपला त्यांच्याशी होणारा संवाद, हेच एक आगळं आनंदमय काव्य म्हणून प्रकटतं !

■

ए १/४, शरयूसरिता नगरी फेज-२, सिंहगड रोड, पुणे ४११०३०.

## लेखकांसाठी सूचना

१. पुढील विषयांसंबंधीचे लेखन ''भाषा आणि जीवन''ला हवे आहे : मराठी व अन्य देशी-विदेशी भाषा, भाषाविज्ञान, भाषांतर, संशोधन, शैली, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय इ० धोरणे, 'भाषा आणि जीवन'मधील लेखांसंबंधीच्या प्रतिक्रिया, पानपूरके.

२. लेखकांनी पुढील पथ्ये पाळावीत :

(अ) कागदाच्या एकाच बाजूस, सुवाच्य लिहावे.

(आ) लेखनाच्या पाकिटावर पुरेशी टपाल-तिकिटे लावावी.

(इ) लेखाच्या अखेरीस स्वत:ची ओळख (शिक्षण, व्यवसाय इ०) एकदोन वाक्यांत लिहावी. त्याचप्रमाणे स्वत:चा पत्ता व ( इष्ट वाटल्यास ) दूरध्वनी क्रमांक द्यावा. (संपादकांच्या सोयीसाठी दूरध्वनी क्रमांक जरूर कळवावा.)

(उ) लेखात इंग्रजी अवतरणांचे मराठी भाषांतर द्यावे. व्यक्तिनामे, ग्रंथांची व लेखांची शीर्षके इ० देवनागरीत लिहावी. (अतिशय अपरिहार्य अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा.)

३. लेखनासंबंधीचा निर्णय एक ते तीन महिन्यांत कळवला जातो. टपाल-तिकिटे जोडलेली असतील तर (आणि तरच) नापसंत लिखाण परत पाठवले जाते.

४. लेखनाला अल्प मानधन दिले जाते.

# जीवन आणि भाषा

अनिल गोरे

जगात भाषांची विविधता आहे. भाषा ज्या प्रदेशांत प्राधान्याने बोलल्या, लिहिल्या जातात, त्या प्रदेशांशी भाषांचे घट्ट नाते असते. याविषयी विचार करताना मी एक निरीक्षण केले आहे. हे निरीक्षण केवळ मराठी, व इंग्रजी या मला कमी-जास्त प्रमाणात माहिती असणाऱ्या भाषांपुरते मर्यादित आहे. या भाषांचे त्यांच्या प्रदेशांशी असलेले नाते त्या-त्या प्रदेशातील भौगोलिक परिस्थिती, तेथील लोकांचे उपजीविकेचे साधन यांच्यावर आधारित असल्याचे आढळते.

मराठी भाषेतील शब्द, वाक्प्रचार यांचा प्रथम विचार करुयात. पुढे काही वाक्ये उदाहरणादाखल देत आहे.

शहरात अफवांचे <u>पीक</u> आले होते.
पत्रकारांनी या प्रकरणाची <u>पाळे-मुळे</u> खणून काढली.
समतेच्या विचाराने महाराष्ट्रात अलीकडे <u>मूळ</u> धरले आहे.
<u>मुळावर</u> घाव घातला की <u>फांद्या</u> आपोआप कोसळतात.
आढ्याचे <u>पाणी</u> वळचणीलाच जाणार.
राघवने उपचारांसाठी <u>पाण्यासारखा</u> पैसा खर्च केला.
दुष्ट सरपंचाने रावसाहेबांच्या घरावरून गाढवाचा <u>नांगर</u> फिरवला.
संस्कारांमुळे मनाची <u>मशागत</u> होते.
अपमानास्पद तहामुळे हिटलरच्या विचारांना सुपीक <u>भूमी</u> जर्मनीत तयारच होती.
नऊ लागले म्हणून कोपराने <u>खणू</u> नये.
तात्या म्हणजे आमच्या गावातील जुने <u>खोड</u> आहे.
महाराष्ट्र सरकारने जॉर्ज बुशला अटक केल्याची बातमी <u>वणव्यासारखी</u> पसरली.
मराठी संवर्धनाची चळवळ आता <u>अरण्यरुदन</u> ठरणार नाही, हे नक्की !
इवल्याशा <u>रोपाचा</u> आज <u>वृक्ष</u> झाला याचे समाधान वाटते.
रमा आजी म्हणाली, ''आता आम्ही <u>पिकली पानं</u> आहोत.''
वीणा एखाद्या <u>फुलासारखी</u> नाजूक होती.
शुद्ध <u>बीजापोटी</u> फळे रसाळ गोमटी !
<u>वृक्षवल्ली</u> आम्हां सोयरी <u>वनचरे</u> !












चिंटूच्या माकडचेष्टांनी त्याची आई हैराण झाली होती.

अंधश्रद्धेचे तण माजल्याने श्रद्धेबद्दलही शंका निर्माण होतात.

अनेक अधिकारी व पुढारी भ्रष्टाचाराच्या दलदलीत अडकले आहेत.

लो. टिळक विजेप्रमाणे कडाडले !

वरील सर्व वाक्ये पाहता ती विविध प्रकारची उदा० सामाजिक, राजकीय, वैचारिक माहिती देणारी वाक्ये आहेत, मात्र त्यांत उपमा म्हणून अथवा अर्थ स्पष्ट करण्यासाठी शेतीशी संबंधित, भौगोलिक परिस्थितीच्या अनुभवांशी संबंधित शब्दांचा वापर मोठ्या प्रमाणात करण्यात आला आहे. महाराष्ट्रात पूर्वापार शेती हाच प्रमुख व्यवसाय होता व इथले जीवन शेती, प्राणी, पंचमहाभूतें यांवर अवलंबून होते यामुळे मराठी भाषेत महाराष्ट्रीयांच्या जीवनाशी व उपजीविकेच्या शेती या व्यवसायासाठी संबंधित शब्द मोठ्या प्रमाणावर आहेत व ते शब्द वापरल्याने वाक्यांचा अर्थ पटकन लक्षात येतो.

आता याचप्रमाणे इंग्रजी भाषेतील शब्द, वाक्प्रचार यांचा विचार करू. उदाहाणादाखल काही वाक्ये देत आहे :

जयप्रकाश नारायण इज सिंकिंग.

मिलिटरी वॉज अँकर्ड् इन् कानपूर फॉर फिफ्टीन डेज्.

टेल्को इज् दि फ्लॅगशिप कंपनी ऑफ टाटा ग्रुप.

रिलायन्स इज् गोइंग फुलस्टीम अहेड इन दि शेअर मार्केट

गव्हर्नमेंट हॅज लॉंचड् थ्री न्यू स्कीम्स ऑन दि इंडिपेंडन्स डे !

जनता बँक हॅज फ्लोटेड ए न्यू सेरीज ऑफ बाँडस् !

महाराष्ट्र हेरल्ड विल चेंज इट्स मास्ट !

लालूप्रसाद इज इन द मिड्स्ट ऑफ ट्रबल्ड वॉटर्स !

सदाशिव समहाऊ रीच्ड द शोअर !

पुणे इज रिसिव्हिंग लार्ज नंबर्स ऑफ ऑफशोअर असाइनमेंट्स !

देअर इज ए व्हेरी स्ट्राँग अंडरकरंट इन् फेवर ऑफ जयललिता !

इंदिरा गांधी वॉज् रायडिंग द हाय टाईड ऑफ पॉप्युलॅरिटी दोज डेज !

जनरल इलेक्ट्रिक इज दि ब्लू व्हेल ऑफ अमेरिकन इकॉनॉमी

द डेक्स वेअर क्लिअर्ड बिफोर दि अरायव्हल ऑफ दि न्यू मिनिस्टर !

ऑपोझिशन पुश्ड् गव्हर्नमेंट इन द डॉक्स इन पार्लमेंट !

देअर वॉज सी ऑफ रबल इन द ग्राऊंड










हॉटमेल इज द बिगेस्ट पोर्टल ऑन दि इंटरनेट !
मिताली इज् ऑलवेज बिझी सर्फिंग द वेबसाईट्स् !
महाराष्ट्र गव्हर्नमेंट्स पॉलिसीज टॉर्पिडोड् प्रोग्रेस ऑफ मराठी लँग्वेज !
फ्रेंड्स गेव्ह थ्री डिपस् टू संतोष ऑन हिज बर्थडे !
अमेरिकन इकॉनॉमी इज फेसिंग रफ वेदर !
देअर आर ब्यूटिफूल ट्रॅफिक आयलंड्स इन नागपूर !
घाटगे-पाटील रोड ट्रान्स्पोर्ट ओन्स अ लार्ज फ्लीट ऑफ ट्रक्स
गांधीजी लेफ्ट बिहाइंड अ टेल ऑफ थॉट्स्

वरील उदाहरणांत आपण पाहू शकतो, की कितीही विविध विषय असले तरी त्यांच्याशी संबंधित वाक्यांमध्ये समुद्र व नौकानयन यासंबंधीचे शब्द डोकावतात. इंग्रज हे प्रामुख्याने दर्यावर्दी होते. त्यामुळे समुद्र व नौकानयन संबंधातील शब्द वापरून ते आपले विचार अधिक परिणामकारकपणे व्यक्त करू शकतात, व हे विचार मग अन्य इंग्रजांना चटकन समजतात.

या भाषांशिवाय अन्य भाषांमध्येही अशीच उदाहरणे मोठ्या प्रमाणात सापडतात अशी माहिती माझ्या अन्य भाषिक परिचितांनी दिली आहे. मात्र नेमकी उदाहरणे गोळा करणे मला अजून शक्य झाले नाही. जाणकारांनी यावर प्रकाश टाकावा असे मी सुचवतो.

थोडक्यात स्थानिक जीवन, स्थानिक भौगोलिक परिस्थिती, नजरेस पडणाऱ्या वस्तू व घटना यांच्याशी स्थानिक, भाषेचा घनिष्ट संबंध असतो. म्हणूनच साऱ्या जगाला एकाच संपर्क भाषेने जखडण्याचा प्रयत्न चुकीचा ठरेल, असे मला वाटते. यामुळेच आपापल्या मातृभाषेत शक्यतो सर्व व्यवहार करणाऱ्या समाजाची चांगली प्रगती होते, असे म्हणता येईल. म्हणूनच जगभर ज्या ज्या भाषा आजवर माहिती झाल्या आहेत, त्या भाषांचा पारंपरिक रीतीने वापर करणाऱ्यांनी त्या टिकवल्या व वाढवल्या पाहिजेत. विविध प्रदेशांची आपसूकपणे माहिती मिळण्याचे त्या प्रदेशातील स्थानिक भाषा हे एक महत्त्वाचे साधन आहे. जागतिकीकरण, वैश्विक खेडे या आधुनिक कल्पनांचा स्वीकार करतानाच हे महत्त्वाचे साधन नष्ट होणार नाही, याची पृथ्वीवरील सर्वात प्रगत प्राणी या नात्याने मानवाने काळजी घेतली पाहिजे. ■

**समर्थ मराठी संस्था, महाराष्ट्र,**
**द्वारा पशुपक्षी औषधालय, ७०५, बुधवार पेठ, पुणे ४११ ००२.**
**संपर्क भ्रमणध्वनि ९४२२००१६७१**

**पुस्तक परीक्षण**

# मराठी भाषेचा इतिहास

सुमन बेलवलकर

[परीक्षित ग्रंथ : 'मराठी भाषेचा इतिहास' ले. डॉ. गं.ना. जोगळेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०. जानेवारी २००५, पृष्ठसंख्या २४०, किंमत रु. २००/- ]

मराठीत ऐतिहासिक भाषाशास्त्राचा परिचय प्रथम संस्कृत पंडितांनी करून दिला. भांडारकर, वैद्य, गुणे यांच्या या परंपरेत पुढे म.अ. मेहेंदळे, रा.भि. जोशी यांची नावे घेता येतात. याच विद्याशाखेत झ्यूल ब्लोक यांनी लिहिलेला (ला फॉर्मास्यिआं) (१९१९) हा ग्रंथ मात्र आधुनिक भाषाविज्ञानाच्या ज्ञानावर आधारित होता. या फ्रेंच परंपरेत तयार झालेले ना.गो. कालेलकर आणि अमेरिकन भाषाविज्ञानात पारंगत असलेले अशोक केळकर यांनी मराठीविषयक मौलिक ग्रंथलेखन केले. अलीकडे विद्यापीठांमध्ये या विषयाचा समावेश मराठीच्या पदव्युत्तर पातळीवर झाल्यावर पाठ्यपुस्तकांची निकड निर्माण झाली. आरंभी संकलित, संपादित पुस्तके लिहून पूर्तता करण्याचा प्रयत्न झाला. 'मराठी भाषेचा इतिहास' हे प्रा. गं.ना. जोगळेकरांनी लिहिलेले पुस्तक या वर्गात समाविष्ट करण्याजोगे आहे.

प्रा. जोगळेकरांना मराठी विषयाच्या अध्यापनाचा विस्तृत आणि दीर्घकालीन अनुभव आहे. 'एखाद्या भाषेची ऐतिहासिक भाषाविज्ञानाला अनुसरून समग्र व सर्वंकष पाहणी कुणी केल्याचे आढळत नाही' या जाणिवेने जोगळेकर स्वतः या लेखनाला उद्युक्त झाले आहेत.

या पुस्तकाची मांडणी करताना स्वत:जवळच्या आणि हाताशी सहज उपलब्ध असलेल्या अन्य सामग्रीचा त्यांनी उपयोग करून घेतला आहे. उदाहरणार्थ, 'मध्यकालीन मराठी' हे सातवे प्रकरण १९८२ साली प्रसिद्ध झालेल्या 'भाषाविज्ञान : वर्णनात्मक आणि ऐतिहासिक' या संकलित पाठ्यपुस्तकात समाविष्ट असलेल्या त्यांच्याच लेखावरून जसेच्या तसे घेतले आहे. मराठीच्या रक्षणाचे/शुद्धीकरणाचे प्रयत्न (प्रकरण ९) हा भाग त्यांच्या पीएच.डी.च्या प्रबंधावर आधारित आहे.

निरनिराळ्या ऐतिहासिक टप्प्यांवरील मराठी भाषेच्या विश्लेषणाला ध्वनिप्रक्रिया, रूपविचार, शब्दसंग्रह आणि वाक्यविन्यास यांचा थोडाफार आधार त्यांनी आपल्या 'अभिनव भाषाविज्ञान' या ग्रंथातून दिला असावा. मराठीचा उगमकाळ ठरविण्यासाठी शं.गो. तुळपुळे यांच्या 'यादवकालीन मराठी'चा टेकू त्यांना मिळाला. पण त्यांच्याच बरोबरीने जुन्या, मोडीत निघालेल्या वैद्य-गुणे वादाचीही त्यांनी इथे चर्चा केली आहे. तीच गोष्ट 'विवेकसिंधू' आणि 'ज्योतिषरत्नमाले'च्या अग्रमानाची. वास्तविक पाहता यापुढे संशोधनातून एखादा नवा आद्यग्रंथ पुढे येईपर्यंत तरी 'लीळाचरित्र' (शके १२००) हा पहिला मराठी ग्रंथ म्हणून मान्यता पावलेला असताना पूर्वीचे वादप्रतिवाद देण्याचे कारण काय ? आहारशुद्धता आणि भाषाशुद्धता यांच्याविषयीचे कृ.पां. कुलकर्णी यांचे मत (पृ.१२) अशास्त्रीय असल्याचा विचार कालेलकरांनी १९६२मध्येच मांडला होता. इथे लेखकाने वेगळे काय सांगितले ?

दुसरा एक मुद्दा अशाप्रकारच्या ग्रंथलेखनात अतिशय महत्त्वाचा असतो; तो त्याच्या शास्त्रीय बैठकीचा. 'मराठी भाषेचा इतिहास' पूर्वी लिहिला गेला नसेल तर या विषयासंबंधीचे अद्ययावत संशोधन, तथ्ये, पुरावे यांची चिकित्सा करून विश्लेषणान्ती निष्कर्ष मांडण्याची जबाबदारी लेखकावर येते. भाषाविज्ञानाच्या संशोधकांनी केलेले काम आता उपलब्ध आहे. त्यादृष्टीने उर्दू-पर्शियनचा अभ्यास डॉ. मुस्तफा, डॉ. दळवी यांनी केला आहे. भाषेच्या प्रमाणीकरणाच्या दृष्टीने डॉ. के.एस. राज्यश्री यांचे संशोधन मराठीच्या बाबतीत महत्त्वाचे आहे. इंग्रजीचा मराठीवर परिणाम या विषयाचा पायाशुद्ध अभ्यास भालचंद्र नेमाडे यांनी आपल्या प्रबंधात केला. तो पुस्तकरूपात प्रकाशितही झाला. (१९९०) परंतु अशा संशोधनाची दखलही न घेतल्यामुळे या ग्रंथाला केवळ वर्णनपर निबंधाचे स्वरूप आले आहे.

भाषावैज्ञानिकाच्या भूमिकेतून या पुस्तकाचे लेखन केले असते तर या विषयाबाहेरचे सर्वसाधारण अनावश्यक वर्णन इथे आले नसते. महाराष्ट्राचे औद्योगिकरण, इतिहास या संकल्पनेचा अतिसुगम खुलासा, भाषेविषयी सामान्य चर्चा यांना संशोधनाचा दर्जा प्राप्त होत नाही. अर्वाचीन कालातील मराठीच्या तथाकथित भाषावैज्ञानिक विवेचनात संस्कृत आणि इंग्रजी व्याकरणाचे विशेष यांचे केलेले वर्णन वरवरचे आहे. इस्लामी आक्रमण आणि इंग्रजी राजवटीमुळे महाराष्ट्रात झालेले धार्मिक, सामाजिक बदल यांची सर्वसामान्य लोकांनाही असलेली माहिती (प्रकरण ५वे) अस्थानी वाटते. हे उल्लेख थोडक्यात करून पुढे जाता आले असते. भाषेच्या इतिहासात भाषिक परिवर्तनाच्या नोंदींची निरीक्षणे आणि त्यांच्यावर आधारित निष्कर्षांना महत्त्व असते. आपली ही भूमिका सोडल्यामुळे 'अंत:पुर' जाऊन 'जनाना' आला (पृ.

१०१), हे बाटलेले किंवा धर्मांतरित इस्लामी (पृ. १०२), इंग्रजांचे कायद्याचे राज्य (पृ. १०६) याप्रकारचा भलताच अभिनिवेश अधूनमधून डोकावताना दिसतो. याउलट ज्या वैज्ञानिक परिभाषेचा अवलंब आरंभापासून हवा तिच्यातील स्वनिमासारखी संकल्पना २४० पृष्ठांच्या या पुस्तकात प्रथम १७३व्या पानावर येते आणि तिचा खुलासा १९८व्या पानावर दिला जातो.

पहिल्या दोन प्रकरणांतील सर्वसाधारण विवेचनानंतर तिसऱ्या प्रकरणात जोगळेकरांनी मराठीच्या जनकभाषेसंबंधीच्या वादाची चर्चा केली आहे. द्राविडी भाषांच्या सतत संपर्कात राहिलेल्या मराठी आणि कोकणी या दक्षिणेतल्या आर्यभारतीय भाषा आहेत. मराठीच्या पूर्वपरंपरेचा शोध शं.गो. तुळपुळे यांनी 'यादवकालीन मराठी'त घेतला. हेच मत बा.अ. भिडे यांचे होते असे संदर्भ न देता सांगून जोगळेकरांनी हे विवेचन संपविले आहे. त्यांच्याशी असलेले मतभेद मो.गो. धडफळे यांनी प्रस्तावनेत पुराव्यांनिशी मांडले आहेत. त्यावरून असे वाटते की प्राकृत, अपभ्रंशाच्या म्हणजे पर्यायाने बौद्ध, जैन इत्यादी साहित्याच्या अभ्यासकांशी लेखनापूर्वी या प्रकारची चर्चा झाली असती तर बरे झाले असते. आधुनिक आर्य भारतीय भाषांचा पूर्वेतिहास लिहिताना वैदिक, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश या भाषांमधील लेखनबद्ध पुरावाच ग्राह्य धरावा लागतो हे निश्चित. पण भाषेचे अस्तित्व तेवढेच असते असे नाही. परिवर्तनांमधून जन्माला येणाऱ्या नव्या भाषेच्या जडणघडणीत ग्रंथनिबद्ध नसलेल्या स्थानिक बोलींचाही वाटा असतो. किंबहुना नव्याने साहित्यरूप घेणारी अशी एखादी भाषा हा त्या बोलीचा प्रमाणीकृत आविष्कार असतो. माडगूळकरांची माणदेशी, बहिणाईची अहिराणी ही आधुनिक काळातली उदाहरणे सांगता येतील. या बोली प्रमाण मराठीतून जन्माला आल्या असे मानणे धाडसाचे होईल. भाषांचे सहअस्तित्व, भाषाभेद आणि कालांतराने त्यांच्यात होणाऱ्या प्रक्रिया यांचे प्रश्न गुंतागुंतीचे असतात. 'दर आठशे ते हजार वर्षांनी एक भाषा लोप पावून तिची जागा दुसऱ्या भाषेने घेतली आहे असे दिसते' (पृ. ४९) इतके त्यांचे उत्तर सरसकट आणि सार्वत्रिक नसते. अशा प्रकारच्या विवेचनात 'सूर्योदय' - 'सूर्यास्त' यासारख्या उपमा (पृ. ४२) वापरणे लेखनाच्या शास्त्रीयतेला मारक ठरते ही गोष्ट अलाहिदा.

या लेखनात लहानलहान मुद्यांविषयीदेखील मतभेदांना बराच वाव आहे असे दिसते. उदाहरणार्थ ळ हा द्राविड भाषांचा समान ध्वनी (पृ. ५९), संस्कृत व प्राकृतात /ळ/ नाही असे लेखकाचे विधान आहे (पृ. ५०). संस्कृतमध्ये नसलेला /ळ/ हा ध्वनी (पृ. ६४) असे म्हणूनही पुन्हा 'आधीची' जी वैदिक संस्कृत तिच्यातही क्वचितच का होईना पण हा /ळ/ आढळतो. (पृ. ६७) असे म्हटल्याने

संदिग्धता निर्माण होते. ऋग्वेदात 'अग्निमीळे पुरोहितम्' या मंत्रात तसेच 'मीळहुषे' या रूपात तो आढळतो अशी उदाहरणे स्पष्टपणे देऊन मग तो पाणिनीय वर्णमालेत आणि अभिजात संस्कृतात नाही असे म्हणणे निरपवाद ठरले असते. द्राविड भाषांचे लक्षण मूर्धन्य व्यंजने आहे हे खरे आहे; पण त्यांचा प्रभाव मराठीसह सर्व आर्यभारतीय भाषांवर झाला तो मूळ संस्कृतातून असे मानले जाते. मराठीने देवनागरी ही संस्कृतची लिपी घेतली असली तरी 'उच्चारदृष्ट्या/ऋ/, /ॠ/, /ऐ/, /औ/, इ. स्वर, ङ्/,/ञ्/,/ष्/ इ. व्यंजने यांचे उच्चारण मराठीने संस्कृतवरूनच घेतले आहे.' (पृ. ६३) असे विधान करताना जोगळेकरांनी दीर्घ /ॠ/, /ञ्/, आणि /ष्/ चा उच्चार मराठीत खरोखर होतो का, याचा विचार केलेला दिसत नाही. मराठी 'भाषा' या शब्दातील /षा/चा मूळ उच्चार अचूक करणारे संस्कृतच्या पार्श्वभूमीमुळे तसा करत असतात. /ङ्/ आणि /ञ्/ या अनुनासिकांचे उच्चार सिंधीत आहेत. मराठीत मात्र /ञ्/ शोधावा लागेल.

मराठीचा उगमकाल ठरविताना आद्य मराठी ग्रंथ, कोरीव लेख यांची माहिती जोगळेकरांनी दिली आहे. ते ज्ञानेश्वरीची कालनिश्चिती (श.१२१२) देतात. पण 'ए डिक्शनरी ऑफ ओल्ड मराठी'मध्ये मान्य केलेला श.१२०० हा लीळाचरित्राचा काळ मात्र इ.स. '१२८४च्या सुमारास' असा मोघम देतात. यादवकालीन भाषेचे स्वरूप ठरविण्याच्या दृष्टीने लीळाचरित्राचे जे अनन्यसाधारण महत्त्व आहे ते त्यांनी कुठेही अधोरेखित केलेले नाही. कष्टपूर्वक केलेल्या क्षेत्रसर्वेक्षणाचा वस्तुपाठ म्हणता येईल असा हा अत्यंत अक्षुण्ण, विश्वसनीय दस्तावेज तत्कालीन अन्य भारतीय भाषांमध्येही एकमेवाद्वितीय आहे. 'मराठी भाषेच्या इतिहासात' तरी या ग्रंथाचे स्थान योग्य रीतीने प्रस्थापित होणे आवश्यक होते.

'राष्ट्रकूट आणि उत्तर चालुक्य या कन्नड भाषकांनी मराठीला उत्तेजन देणे संभवत नव्हतेच' (पृ. ९६) हे लेखकाचे मतही काहीसे आजच्या भाषिक वादांवर पोसलेले आहे असे वाटते. प्राचीन/मध्ययुगीन काळातले राजे परधर्मालादेखील आश्रय देत असत. श. १२९०च्या मैलंगी शिलालेखात ''नागर कन्नड तिगुळ आरेवन ओडिसुन बालसिक्षे उपाध्यर जीवितक्के गद्याणं आरु'' असा उल्लेख आहे. कन्नडभाषक राजे ''आरे'' म्हणजे मराठी भाषेच्या प्राथमिक शिक्षणाचा योगक्षेम वहात होते हे यावरून स्पष्ट आहे. संशोधनपर लेखनात केवळ तथ्यांना स्थान असते; वैयक्तिक मतांना किंवा पूर्वग्रहांना नाही.

मराठीच्या इतिहासाच्या संदर्भात जोगळेकरांनी स्वीकारलेली इस्लामी आक्रमणानंतरची अरबी-फारसीच्या प्रभावाखालील मराठी आणि इंग्रजी राजवटीनंतरची

मराठी ही विभागणी सर्वसाधारणपणे मान्य होण्याजोगी आहे. आदिकालापासून केलेले प्रत्येक टप्प्यावरील विवेचन मात्र बरेचसे वर्णनात्मक निबंधासारखे आहे. सहज कानावरून गेलेली काही उदाहरणे देत भाषेचे कमी आणि अन्य बाबींचे अधिक असे हे विश्लेषण आहे. ज्ञानेश्वरीतील ओव्या आणि नामदेवाचे अभंग यासंबंधीचे विवेचन भाषावैज्ञानिक आहे असे म्हणता येणार नाही. यादृष्टीने ज्ञानेश्वरीची राजवाडे प्रत आणि सरकारी प्रत यांची चिकित्सा भाषेवर प्रकाश टाकण्यासाठी मार्गदर्शक ठरली असती. फारसीचा प्रभाव दाखविण्याच्या दृष्टीने जोगळेकरांनी एखाद्या अस्सल ऐतिहासिक पत्राचेही भाषावैज्ञानिक विश्लेषण करू नये याचे आश्चर्य वाटते.

मराठी भाषेचे अभ्यासक या ग्रंथाकडे संशोधनपर ग्रंथ म्हणून पाहतील तर अधूनमधून आलेली अशास्त्रीय विधाने त्यांना खटकल्यावाचून राहणार नाहीत. उदाहरणार्थ - 'भारतीय भाषा स्वत्व हरवून बसल्या आहेत. त्या 'नष्ट' झाल्या नसल्या तरी 'भ्रष्ट' झाल्या आहेत (पृ. १७)' 'मराठीत भविष्यकाळ फक्त एकाच प्रकारचा आहे (पृ. ६५). '''करावयाचे' व 'करायचा' या दोन रूपांतले 'करायचा' हे रूपच स्वीकारले जाते कारण त्यात एका ध्वनीचे उच्चारण टाळण्याची सोय आहे'' (पृ. १०). वास्तविक ही रूपे अनुक्रमे औपचारिक लिखित भाषेत आणि बोलभाषेत वापरण्याची रीत आहे. ''महाराष्ट्री प्राकृत ही मूलत: दक्षिणेकडील प्राकृत भाषा पण तिच्या योग्यतेमुळे (कोणत्या?) तिला अखिल भारतीय स्वरूप प्राप्त झाले'' (पृ.५०). तद्भव शब्दांत मात्र ऋ ऐवजी र किंवा रि अशी प्रक्रिया होते. उदा० तृण-तण, हृदय-हियें, प्रावृष-पाऊस इत्यादी (पृ. १४७) 'मराठीने /ॲ/, /ऑ/ हे उच्चार स्वीकारून ते मुळाबरहुकूम करणे सुरू केले... कारण मराठीत आश्चर्यदर्शक ऑ किंवा आँ हा उद्गार प्रचारात असल्यामुळे... नकार आणि तुच्छता दाखविण्यासाठी / हॅं:/ हा /ॲ/ युक्त उच्चार रूढ आहे. (पृ. १९८) (/ॲ/ऑ/साठी) अल्पतमयुग्मे दाखविली जातात त्यातील एक शब्द इंग्रजी असतो हे मान्य करावेच लागते. (पृ. १९८) वास्तविक यात नवल ते कसले ? 'उजेड'पासून उजाडणे ('उजाड'पासूनही उजाडणे) शक्य (पृ. २०९) 'पगार' हा शब्दही पोर्तुगीज आहे. 'विवक्षित अंतराने नोकरास मिळावयाची रक्कम ही यामागील संकल्पना नवी असल्यामुळे 'पगार' हा शब्द मराठीने स्वीकारला. (पृ. २१४) याचा अर्थ पूर्वी नोकर नव्हते की त्यांना काहीच दिले जात नव्हते ? लीळाचरित्रातही 'मागील मासवडेयाचे (द्रव्य) आले नाही जी आणि पुढील मासवडा भरला जी.' (पूर्वार्ध, लीळा क्र. ६३, सं.नागपुरे, दु.आ. २००४) असा उल्लेख आहे. अशी काही उदाहरणे पाहिली तरी ही गोष्ट लक्षात येते.

एखाद्या अभ्यासशाखेत तर भर घालणारा संशोधनपर ग्रंथ लिहिताना जागोजागी

अचूक संदर्भ आकडेवारी, नकाशे इ० देणे आवश्यक असते. महाराष्ट्राच्या भूमीवर नांदलेल्या ऐतिहासिक घराण्यांचा राज्यविस्तार दाखवणारे नकाशे जर या ग्रंथात समाविष्ट करता आले असते तर कन्नडभाषी राज्यकर्त्यांचा प्रभाव समजण्याच्या दृष्टीने ते उपयुक्त ठरले असते. ज्या अन्य ग्रंथकारांची नावे विवेचनात येतात त्या विल्सन, इरावती कर्वे, विश्वनाथ खैरे, तगारे, बा.आ. भिडे यांच्या ग्रंथातील अवतरणे किंवा आवश्यक ते संदर्भ प्रकरणाच्या शेवटी आढळत नाहीत. अष्टाध्यायीपासून अनेक ग्रंथांची नावे येतात; पण त्यांचा लेखनकाल दिलेला नाही. भाषिक विश्लेषण केलेल्या कोरीव लेखांचे, अभंगांचे संदर्भ दिलेले नाहीत. 'महाराष्ट्राची लोकसंख्या नऊ ते दहा कोटीच्या घरात जाते', 'केरळच्या खालोखाल महाराष्ट्रात साक्षरतेचे प्रमाण दुसऱ्या क्रमांकाचे आहे.' (पृ. १, २) असे संदर्भ, अचूक आकडेवारी देणे सहज शक्य असूनही मोघम देणे हा निबंध झाला; संशोधन नाही. 'देवगिरीचे नामकरण दौलताबाद असे झाले.' (पृ. १००) हे सर्वांना माहीत आहे. ते मुहम्मद तुघलकाने १३२६-२७मध्ये कुव्वत-उल-इस्लाम → कुत्बाबाद → दौलताबाद असे केले. या ऐतिहासिक नोंदीने ग्रंथाचे संशोधनमूल्य वाढले असते. आधाराशिवाय विधाने करणे हा देखील याच प्रकारचा दोष मानता येईल. 'कर्णाटकाचे कन्नडनाडू हे नाव' (पृ. २५) 'मराठीचा जन्म द्राविड भाषांपासून झाला असे एक मत मांडण्यात आले आहे किंवा सुचविण्यात आले आहे' (पृ. ५१) 'च/च्य द्राविड परिणाम आहे असे जे मत मांडण्यात आले आहे' (पृ. ६०) अशी सोडून दिलेली विधाने ग्रंथाला ठिसूळ बनवितात. क्वचित् साधे संदर्भही न तपासता ठोकून दिले आहेत. ''भद्रा उत्तरे...'' (पृ. १३७) हे देवस्थान असूनही त्याचा अर्थ भद्र म्हणजे वरिष्ठ वर्णीयांची वस्ती असा लावला आहे. लीळाचरित्राच्या उत्तरार्धात चक्रधरांनी सांगितलेली कहानी (पृ. २४) ही वास्तविक पूर्वार्धाच्या ११२ या क्रमांकाच्या लीळेत आहे. (संपा. नागपुरे, दु.आ.पुणे २००४). 'दढमडह सामलंघे सहिरे अहिमाण कलहसीले य' या पंक्तीचा अर्थ 'सावळ्या रंगाचा, काटक, कष्टाळू, सहनशील, मध्यम चणीचा, स्वाभिमानी पण भांडखोर' (पृ. ३७) असा नसून क्रमशः ''दणकट, मंडित (नटलेले), सावळे, सोशीक, अभिमानी, भांडखोर जे'' असा आहे. (यातील शेवटचे दोन संदर्भ मराठीच्या प्राध्यापकांच्या अध्यापनात जवळजवळ दरवर्षी येत असतात.)

कदाचित जागरूकपणे सफाईचा हात न फिरवल्यामुळे या ग्रंथात केवळ मुद्रणदोषच राहिले आहेत असे नाही; तर चुकीच्या शब्दयोजना आणि कोलमडलेल्या वाक्य-रचनांचाही आढळ होतो. 'प्रागैतिहासिक'ऐवजी 'पौराणिक' (पृ. ५) भविष्यकाळ 'अज्ञात' (पृ.३. तो तसाच राहणार - ज्ञात/अज्ञात ही विशेषणे

भूतकाळासाठी आहेत), आहार-शुद्धतेविषयीचे मत 'अतार्किक/तर्कदुष्ट' न म्हणता 'अतिशयोक्तीचे' म्हणणे (पृ. १२), 'औद्योगीकरणा'च्या जागी 'औद्योगिकता'चा वापर (पृ. १६) भाषा 'प्रचलित' होती असे न म्हणता तिचा 'वावर' होता (पृ. ५१) मराठी आणि कन्नडचा 'अप्रत्यक्ष जन्यजनक' संबंध (?), इंग्लंडचा राजकीय व आर्थिकदृष्ट्या 'दर्जा' (प्रभुत्व/सार्वभौमत्व) कमी झाला' अशी काही उदाहरणे दाखवून देता येतात. आब्रु (आबरू), चालाख (चालाक), झिक्र (जिक्र), झमीन (जमीन), माइटर (मास्टर) इ० शब्दांचे देवनागरीतील लेखनही अचूक होणे आवश्यक होते.

काही ठिकाणी क्रियापदाचे योग्य रूप वापरण्यात आलेले नाही असेही आढळते. उदा० ताम्रपटांमुळे... मदत 'होई'ऐवजी 'होते' (पृ. २३) योग्य वाटते. पृ. १६ आणि २३ वरील वाक्यांमध्ये 'असणे'च्या जागी 'आहे' योग्य होते. ज्ञानेश्वरी... येतो/येत असे (पृ. ७५) ऐतिहासिक पत्रव्यवहाराचा... भाग आहे/उपयुक्त ठरतो (पृ. १८१) अशी रूपे योग्य ठरली असती. कधी शब्दांचा अथवा वाक्यांशाचा क्रम योग्य न राखल्यामुळे वाक्य पूर्णतः विस्कटते. देशांची भाषिक, नीती सांगणारी वाक्ये (पृ. १६), 'महाराष्ट्रापासून दूर' अशी एकाच वाक्यातील पुनरुक्ती (पृ. ८९), अक्षी - अलिबागचे अंतर (पृ.९२), अर्वाचीन काळ... या वाक्यात 'सामान्यत:' 'प्रामुख्याने' या क्रियाविशेषणांच्या बदललेल्या जागा (पृ. १८३), प्राथमिक शाळा व हायस्कूल. तीस वर्षे उलटल्यावर (१८५)मधील वाक्यांशाचा क्रम, गेल्या पन्नास वर्षांत या दीर्घ वाक्याची रचना (पृ. २३८), ''ही सेड दॅट...'' या वाक्याचे मराठी भाषांतर (पृ. २००) इ० ठिकाणी दोष टाळणे सहज शक्य होते.

या ग्रंथाला डॉ. मो.गो. धडफळे यांची प्रोत्साहक प्रस्तावना आहे. आपल्या अचूक संशोधन-निरीक्षणांनी काही महत्त्वाचे आपूर्तिपर मुद्दे त्यांनी मांडले आहेत. वाचकांच्या ज्ञानात भर पडेल अशी माहिती या प्रस्तावनेत आहे. 'मराठी भाषेचा इतिहास' या शीर्षकाखाली आर्यकुलात मराठी भाषेचे स्थान, मराठीचा उगमकाल निश्चित करण्याच्या दृष्टीने उपयुक्त अशा कोरीव लेखांची माहिती, इस्लामी आक्रमण आणि ब्रिटिश राजवट यांचा मराठीवर झालेला भाषिक परिणाम, भाषाशुद्धीची चळवळ अशा अनेक महत्त्वाच्या विषयांची माहिती वाचकांना एकाच ठिकाणी मिळण्याच्या दृष्टीने हे पुस्तक उपयुक्त आहे.

■

**संचालक, पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे**

# कोशरचनेवरील सैद्धांतिक ग्रंथ

सुमन बेलवलकर,
(विजया देव यांच्या सहकार्याने)

[परीक्षित ग्रंथ : 'कोशवाङ्मय विचार आणि व्यवहार', ले. डॉ. सदाशिव देव, प्रथमावृत्ती मे २००२, सुपर्ण प्रकाशन, पुणे, मूल्य रु. ३००/- पृष्ठसंख्या ४४७]

'कोशवाङ्मय विचार आणि व्यवहार' हा डॉ. सदाशिव देव यांचा ग्रंथ एकूणच कोशवाङ्मयाचा इतिहास, त्याची निर्मिती, स्वरूप, व्यवहार, ज्ञानाच्या क्षेत्रातील त्याचे स्थान इत्यादींची सैद्धान्तिक चिकित्सा करणारा आहे. डॉ. देव हे गणितशास्त्रज्ञ, उच्चस्तरीय गणिताचे संशोधक, अध्यापक म्हणून जागतिक पातळीवर नावाजले गेले आहेत. मराठी साहित्याच्या आणि भाषेच्या प्रेमातून त्यांनी आपल्या अभ्यासक्षेत्रापेक्षा वेगळ्या विषयावरचे हे लेखन जाणीवपूर्वक मराठीत केले आहे. त्यांची मूळ बैठक शास्त्रीय संशोधकाची असल्यामुळे या ग्रंथाच्या रूपाने मराठीत एका मौलिक वैचारिक ग्रंथाची भर पडली आहे.

आद्य फ्रेंच कोशकार डेनिस दिदेरॉपासून भारतातील मुख्य भाषांमधील कोशवाङ्मयाचा धांडोळा डॉ. देव यांनी या ग्रंथात घेतला आहे. ग्रंथातील एकूण प्रकरणांची रचना गणितज्ञाने केल्याचे जाणवते. 'कोशवाङ्मयाची भूमिका' या पहिल्या प्रकरणात कोशवाङ्मयाची पार्श्वभूमी मांडण्यात आली आहे. विविध क्षेत्रांमधील माहिती जमा करण्याच्या माणसाच्या कुतूहलाचा परिपाक ज्ञानभांडाराच्या व्यवस्थापनात होतो. ही प्रक्रिया कशी असते याचा शोध या प्रकरणात घेऊन कोशवाङ्मयाची मूळ भूमिका लेखकाने सिद्ध केली आहे. विश्वकोश, चरित्रकोश, शब्दकोश आदी प्रकारांची चर्चा डॉ. देवांनी दुसऱ्या प्रकरणात केली आहे. सूचिकोशाचे आणि अन्य प्रकारच्या संदर्भ साहित्याचे संशोधनक्षेत्रातील महत्त्व जाणून त्यांचाही तपशीलवार परामर्श घेतला आहे. मराठीतील कोशकार्याची स्वतंत्र प्रकरणात चर्चा करून संस्कृतसह अन्य काही भारतीय भाषांमधील कोशवाङ्मयाचा आढावा लेखकाने घेतला आहे. आपल्या ग्रंथाला मराठी-इंग्रजी संदर्भसूची, शब्दसूची आणि नामसूची देण्याला लेखक विसरत नाही. डॉ. सुधीर

रसाळांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना या ग्रंथाला लाभली आहे. जरूर तेथे मतभिन्नता नोंदवून अशा प्रकारचे लेखन करणारे, तेही अन्य विषयांचे तज्ज्ञ, कमी असतात हे ओळखून प्रा. रसाळांनी ग्रंथाची यथायोग्य भलावणही केली आहे. या ग्रंथाचे सर्वस्पर्शी स्वरूप पाहता, ''डॉ. केतकरांचा 'ज्ञानकोश' हा कोशनिर्मितीचा जसा अभिमानास्पद प्रारंभ तसाच स.ग. देव यांचा कोशवाङ्मयाच्या स्वरूपाची आणि व्यवहाराची चिकित्सा करणारा हा ग्रंथही अभिमानास्पद प्रारंभ'' ही त्यांची प्रशस्ती लेखकाला गौरवास्पद आहे.

विविध प्रकारच्या माध्यमांतून माणूस पुरातन काळापासून ज्ञानप्राप्ती, ज्ञानसंचय आणि पुढील पिढ्यांकडे ज्ञानसंक्रमण करत आला आहे. कोशनिर्मिती हे माणसाच्या प्रगतीच्या वाटचालीतील एक महत्त्वाचे साधन आहे. 'विषय व संज्ञा इत्यादींचे संग्रहयुक्त विवेचन करणारा ग्रंथ' ही डॉ. देवांची व्याख्या थोडी फिरवून 'विषय व संज्ञा' इत्यादींचा विवेचनयुक्त संग्रह करणारा ग्रंथ' असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. आपले कुतूहल पूर्ण होण्यासाठी माणसांनी कोशसंस्कृती निर्माण केली आहे आणि आधुनिक जगातला कोणताही देश, प्रगत भाषा याला अपवाद नाही.

कोशनिर्मिती ही साहित्यनिर्मिती असली तरी मूलतः वैचारिक स्वरूपाची, तर्कबुद्धीने ज्ञेयविषयाकडे पाहणारी, वस्तुनिष्ठतेचे पथ्य पाळणारी आणि वाचकाभिमुख अशी रचना आहे. एकहाती प्रचंड कोशनिर्मिती करणाऱ्यांप्रमाणेच कोशनिर्मितीमागे वर्षानुवर्षे कार्यरत असलेल्या मोठ्या संस्था आणि त्यांची यंत्रणाही आढळते. विविध ज्ञानघटक कोशात संशोधनाच्या कसोट्यांवर पारखून नेमक्या, शिस्तबद्ध शब्दयोजनेत संग्रहित केलेले असतात. या वैशिष्ट्यांनुसार अनेक विदेशी, प्राचीन संस्कृत कोशांचा, आधुनिक भारतीय भाषांमधील कोशनिर्मितीचा आलेख देऊन डॉ. देव मराठीतील कोशनिर्मितीचे विवेचन करतात.

ज्ञानसंग्रह हा कोशनिर्मितीचा मुख्य हेतू असला तरी कोशरचना आणि भाषाविकास परस्परांशी निगडित असतात. विशेषतः ज्ञानभाषा म्हणून विकसनशील असलेल्या मराठीसारख्या भाषेला कोशांचा मोठाच आधार असतो. मराठीच्या वर्णानुक्रमाचे विश्लेषण करताना डॉ. देव परंपरा, वैज्ञानिक दृष्टी आणि व्यावहारिकता यांचे पूर्ण भान ठेवताना दिसतात. त्यांच्या निष्कर्षांविषयी मतभेद होऊ शकेल; परंतु भूमिकेविषयी नाही.

कोश हे संदर्भसाहित्य अजूनही मोठ्या प्रमाणावर छापील पुस्तकांच्या रूपात असले तरी माहिती-तंत्रज्ञानाच्या आधुनिक युगात संगणकाचे महाजाल त्याची जागा घेऊ पाहात आहे. सी.डी., इंटरनेट इत्यादींचे अद्ययावत विवेचन लेखकाने 'इलेक्ट्रॉनिक

माध्यम' या प्रकरणात केले आहे. एका स्वतंत्र प्रकरणात या नवीन दिशांचा लेखकाने करून दिलेला परिचय अभ्यासकांना अतिशय मार्गदर्शक ठरेल. विज्ञान-तंत्रज्ञानातील प्रगतीचा हा मार्ग वाचकांना खुला करताना प्राचीन काळी भारतीयांनी ज्ञानाची जी क्षेत्रे पादाक्रांत केली होती, त्यांचाही उल्लेख डॉ. देव करतात. भारतीय कालगणना, पंचांग संशोधन, कोशवाङ्मयाच्या संदर्भात कालमापनाचे स्थान, संस्कृत भाषेतील कोशवाङ्मयाची दीर्घ आणि अभ्यासपूर्ण परंपरा यांविषयीचे लेखकाचे साधार विवेचन वाचनीय आहे.

मराठी वाचकाला आत्मपरीक्षण करायला भाग पाडेल आणि त्याचे मनोरंजनही होईल अशी माहिती या पुस्तकात वाचायला मिळते. उदाहरणार्थ अमेरिकेत दरवर्षी १८०० कोश प्रसिद्ध होतात; त्यांपैकी काहींची किंमत २००० डॉलर्स असते. विशेष म्हणजे १० लाख कोश दरवर्षी विकले जातात. कारण साधारणपणे ५०% कुटुंबांत कोश विकत घेतले जातात. अमेरिकेची आर्थिक सुबत्ता एवढे एकच कारण त्यामागे नाही. महाराष्ट्रात किमान ५०% कुटुंबे साक्षर आहेत आणि कोश खरेदी करण्याची ऐपत असलेलेही कमी नाहीत. कमी पडते ती ज्ञान मिळवण्याची आच. कोशनिर्मितीसाठी स्वयंप्रेरणेने सहकार्य करणाऱ्या श्रीमती लास्कींचे उदाहरणही उद्बोधक आहे. कादंबरीलेखन आणि पुस्तक-परीक्षण करणाऱ्या या बाईंनी आपल्या हयातीत नव्या शब्दांची अडीच लाख उद्धृते (सायटेशन्ज्) पाठवली होती. हेच काम ऑक्सफर्डसाठी अनेकजण करीत होते. अलीकडे मराठी वाङ्मयकोशाचे काम करणाऱ्या श्री. सदानंद भटकळांचा अनुभव मात्र फारसा उत्साहवर्धक नव्हता.

जगातल्या प्रचंड कोशनिर्मितीचे या पुस्तकात दिलेले आकडेदेखील आपल्याला थक्क करणारे आहेत. जर्मनीत १७३२ ते ५० या काळात ६४ खंडांचा कोश प्रसिद्ध झाला. (आपल्या ज्ञानकोशाचे तेवीस खंड आहेत.) मेयरच्या पंचवीस-खंडात्मक कोशाची नववी आवृत्ती १९७३ ते ८१ या काळात प्रसिद्ध झाली. त्याची किंमत ५००० डॉलर्स असून त्यात अडीच लाख नोंदी आहेत. न्यू एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका या आजवर आदर्श मानल्या गेलेल्या कोशाच्या पंधरा आवृत्त्या निघाल्या असून त्याची शब्दसंख्या साडेचार कोटी आहे. इंग्रजीत आद्याक्षरांचाही कोश डिसोला राल्फ यांनी बनवला असून त्याची पृष्ठसंख्या ६४० आहे. त्याच्यादेखील पाच आवृत्त्या निघाल्या आहेत.

ऑस्ट्रेलियातील विचित्र प्राण्याचे नाव आदिवासीने 'मला माहीत नाही' या अर्थाने आपल्या भाषेत 'कांगारू' म्हटले - तोच शब्द रूढ झाला ही माहिती मनोरंजक आहे. भारतीयांना अभिमानास्पद वाटू शकेल अशी एक गोष्ट म्हणजे रॉजेने तयार

केलेल्या थिसॉरस (एकार्थी कोश)मध्ये १८०८ साली सेरामपूरला प्रसिद्ध झालेल्या अमरकोशाचा आदराने उल्लेख केला आहे.

एकूणच कोशवाङ्मयाचा जागतिक नकाशा नजरेसमोर ठेवून सैद्धान्तिक विवेचनापासून प्रत्यक्ष उदाहरणांपर्यंत सर्व काही लेखकाने या ग्रंथात देण्याचा प्रयत्न केला आहे. लेखकाच्या मनाची उन्नत आध्यात्मिक बैठक, तर्ककठोरतेपेक्षाही प्रसंगी 'माणूसपणा' महत्त्वाचा मानणारे लेखकाचे भान यामुळे या ग्रंथाला एक वेगळी उंची प्राप्त झाली आहे. संशोधनाची सर्व शिस्त सांभाळून केलेली अभ्यासपूर्ण मांडणी हे जसे या लेखनाचे एक वैशिष्ट्य आहे त्याप्रमाणे शास्त्र-विवेचनाला योग्य अशा फुलोराविरहित प्रगल्भ मराठीचा सहज वापर हाही त्याचा अनुकरणीय विशेष आहे. या कारणांमुळे या ग्रंथाची वाचनीयता वाढली आहे.

आपली ऐपत नसतानाही कोशवाङ्मयाच्या प्रचंड निर्मितीला हात घालणारे लोक आपण पाहतो. किंमत खिशाला परवडणारी आहे की नाही याचा विचार न करता जुन्या/नव्या बाजारात कोश दिसताक्षणी खरेदी करणारेही काही संग्राहक असतात. या दोन्ही प्रकारच्या लोकांनी जवळ बाळगावे असे हे पुस्तक आहे.

■

**पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज आवार, पुणे ४११००६**



**पुस्तक परीक्षण**

# 'मराठीचिये मंदिरी'

सुमन बेलवलकर

[परीक्षित ग्रंथ : 'मराठीचिये मंदिरी', ले. श्री. ना. चाफेकर, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे ३०, १ मे २००४, पृष्ठसंख्या ६४, मूल्य ५०/- रु.]

सामाजिक प्रश्नांच्या बाबतीत बोलके आणि कर्ते सुधारक अशा दोन आघाड्या असतात. दोघेही आपापल्या परीने प्रश्न सोडवत असतात. मराठीच्या अस्तित्वासंबंधीच्या प्रश्नावर जे कर्ते सुधारक आहेत अशांमध्ये 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक' या शतायुषी संस्थेच्या कार्याशी दीर्घकाळ निगडित असलेले श्री.ना. चाफेकर यांचा समावेश होतो. त्यांच्या लेखनाचा आणि कार्याचा यापूर्वी यथोचित गौरव झाला आहे. 'मराठीचिये मंदिरी' हे त्यांचे छोटेखानी पुस्तक त्यांनी आपली 'धुळाक्षरे' म्हणून वाचकांपुढे ठेवले आहे.

'अशुद्ध लिपी, अशुद्ध लेखन, निकृष्ट लेखणी आणि परभृत वाणी हे आजच्या मराठी साहित्याचे मुख्य लक्षण होऊन बसले आहे.' (पृ.३०) हे साहित्याविषयीचे मत आणि 'मराठीचे नाव बदलून मंग्लिश असे ठेवावे लागेल' (पृ.१५) हे भाषेविषयीचे निरीक्षण यांमुळे अत्यंत अस्वस्थ झालेल्या चाफेकरांनी अतिशय पोटतिडीकीने हे पुस्तक लिहिलें आहे.

ही परिस्थिती सुधारण्यासाठी 'मोजक्या शब्दांत नेमकी घटना दुसऱ्यास सांगण्याची हातोटी व्याकरणाने येत असते' (पृ.१८) म्हणून मराठीचे व्याकरण चांगले शिकले पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. मराठीचा पाणिनी झाला नाही; तसेच ज्ञानविज्ञानाची भाषा म्हणून इंग्रजी समृद्ध करणाऱ्या पाश्चात्य लेखकांसारखे लेखक, वैज्ञानिक मराठीत झाले नाहीत याची त्यांना विलक्षण खंत वाटते.

मराठीच्या अभिवृद्धीसाठी त्यांनी काही ठोस सूचनाही मांडल्या आहेत. (पृ. ५६, ५७) मराठीचा महाकोश निर्माण करणे, स्वतंत्र इतिहास लिहिणे इ० चाफेकरांच्या सूचना निश्चितच विधायात्मक स्वरूपाच्या आहेत. त्यामागची त्यांची

कळकळ प्रामाणिक असली तरी या सूचनांपैकी काही अगदी टोकाच्या वाटतात. उदा० परप्रांतीयांची घुसखोरी रोखली पाहिजे असे म्हणता म्हणता शासकीय नोकरीसाठी शुद्ध मराठी आवश्यक हा शासनाचा निर्णय होईपर्यंत सर्व शिक्षणच बंद ठेवावे (पृ. २४). हे मत अतिरेकी, तर 'जगातील सर्वोच्च व अत्याधुनिक मूलभूत ज्ञान मिळावे म्हणून पाश्चात्य देशांतून मराठी हा विषय आवश्यक म्हणून ठेवला गेला पाहिजे' (पृ. ५८) हा आग्रह स्वप्नरंजनात्मक आहे.

भाषेच्या बाबतीत संवेदनशील चाफेकरांचा सर्वात मोठा आग्रह आहे तो भाषाशुद्धीचा. मराठीत मिसळून गेलेले मुस्लिम, ब्रिटिश राजवटींमधले शब्द क्रमशः काढून भाषा 'शुद्ध' केली पाहिजे असा त्यांचा महत्त्वाकांक्षी प्रस्ताव आहे. पण मग उगमकाळी हळेगन्नड (जुनी कन्नड)मधून झालेल्या उसनवारीचे काय ? शिवाय इंग्रजी रोज जगभरातल्या भाषांमधून येणाऱ्या शब्दांनीच समृद्ध होते आहे ही या प्रश्नाची दुसरी बाजूही महत्त्वाची आहे. सांस्कृतिक सरमिसळीच्या खुणा म्हणून बुफे, केक कापणे, भेटकार्डे पाठवणे यांना आक्षेप घेत घेत तो बायकोने नवऱ्याला एकेरी नावाने संबोधण्यापर्यंत ताणणे काहीसे अव्यवहार्य आहे. पाश्चात्य राहणी, पोशाखाला हरकती नोंदवणाऱ्या लेखकाचे छायाचित्र पुन्हा कोटातलेच आहे.

स्वच्छ मराठी न बोलता अनाठायी इंग्रजी शब्दांचा हव्यास आक्षेपार्ह वाटणे गैर नाही. परंतु त्वर्यंची खूण, सूचिकर्म, उत्तरीयस्त्र, समधाग्याचा, जोडकापे, किरकोळ (रुग्ण) या शब्दांचा अर्थ मूळ इंग्रजी शब्द माहीत असल्याशिवाय लागत नसेल तर त्यांचा उपयोग काय ?

या पुस्तकात लेखकाने मांडलेले सर्वच विचार शास्त्रकसोटीवर टिकणारे नाहीत. 'शुद्ध' भाषेची लेखकाची संकल्पना, प्रमाणभाषेची व्याख्या (पृ. २२), भाषाशास्त्रीय-दृष्ट्या मराठीला अपभ्रष्ट ठरवणे (पृ.३३), दीर्घ ॠ आणि ऌ तसेच अं, अः विषयीची विधाने यांना आधुनिक भाषाविज्ञानाचा आधार नाही. बाळबोध लिपी जगात अद्वितीय म्हणणे हा अभिनिवेशही (पृ.४०) टिकणारा नाही. तसेच साहित्य संमेलनाध्यक्षांच्या निवडीतील राजकारण, शिक्षण आणि आजच्या वाङ्मयातील जातीयता, शुद्धलेखनाचे नवे नियम ठरविताना घडलेल्या पण आज भूतकाळात जमा झालेल्या गोष्टींचा उल्लेख मतप्रदर्शनासह करणे लेखकाने टाळले असते तर बरे झाले असते.

अखेर 'मराठी मुलगा जे बोलेल ते जगाच्या पाठीवर सर्वत्र ऐकू गेले पाहिजे आणि जे लिहील त्याची पारायणे केली गेली पाहिजेत' (पृ. ४१) हा श्री. चाफेकरांचा आशावाद दुर्दम्य आहे यात शंका नाही. ■

**संचालक, पश्चिम विभागीय भाषा केंद्र, डेक्कन कॉलेज आवार, पुणे ४११ ००६.**

**पुस्तक परीक्षण**

# "थाई भाषा शिका"

नीती बडवे

[परीक्षित पुस्तक : 'थाई भाषा शिका', ले. डॉ. एन्. जी. बापट, नितीन प्रकाशन, पुणे, २००४, पृष्ठे २७४, किंमत २००/- रु.]

"थाई भाषा शिका" हे सरळ, साधं आणि उत्सुकता वाढवणारं पुस्तकाचं शीर्षक. लेखक डॉ. बापट हे वाणिज्य शाखेतले प्राध्यापक. त्यांनी निवृत्तीनंतर अभ्यागत अध्यापक म्हणून थायलंडमध्ये अर्थशास्त्र शिकवलं. तिथे ते स्वत: थाई भाषा शिकले. एका अर्थशास्त्रज्ञानं ह्या भाषेतले बारकावे लक्षात घेऊन, तिची ओळख करून देणारं पुस्तक मराठीत लिहावं, हे विशेष कौतुकास्पद आहे.

पुस्तकाच्या पहिल्या दोन प्रकरणात त्यांनी थायलंड आणि थाई भाषेच्या इतिहासाची ओळख करून दिली आहे. तसंच थाई भाषकांच्या स्वभाव वैशिष्ट्यांबद्दल माहिती दिली आहे. थाई भाषेची ओळख करून देताना डॉ. बापट यांनी सतत तौलनिक दृष्टिकोण ठेवला आहे. परकी भाषा शिकताना स्वभाषेशी तिचं साधर्म्य-वैधर्म्य पडताळून पाहाणं ही स्वाभाविकपणे घडणारी गोष्ट आहे. आणि नवीन भाषा शिकताना अशा तुलनेचा फायदाच होतो.

पुढच्या तीन प्रकरणांत डॉ. बापटांनी अनुक्रमे लेखन आणि उच्चारण पद्धती, शब्दांची घडण आणि वापर, तसंच वाक्यरचना ह्याविषयी सोदाहरण माहिती दिली आहे. तिसरं प्रकरण गुंतागुंतीचं आणि आव्हानात्मक आहे, त्यात लिपी आणि उच्चारणविचार आला आहे.

थाई भाषेत स्वरसंख्या एकूण तुलनात्मकदृष्ट्या खूपच जास्त आहे, म्हणजे एकूण ४४ स्वर आहेत. त्यातल्या १२ स्वरांचे प्रत्येकी ऱ्हस्व व दीर्घ असे उच्चार केले जातात. त्यातही मुळातली स्वरचिन्हं एकत्रित गटानं वापरून स्वतंत्र उच्चारांसाठी वापरली जातात. काही स्वरांसाठी लिहिण्याच्या एकाहून जास्त शक्यता आहेत, तर काही चिन्हांचे वेगवेगळे उच्चार आहेत. प्रत्येक 'स्वना'साठी स्वतंत्र चिन्हं नाही. काही चिन्हं 'अनुच्चारित' आहेत, तर काही लोप पावलेल्या म्हणजे 'अलिखित' चिन्हांचे

उच्चार केले जातात.

थाईमधे 'ऑ'साठीचं चिन्ह सगळ्यात घोटाळ्याचं आहे. ''हे चिन्ह दोनदा लिहिलं, तर त्याचा उच्चार 'ऑ' पण त्यातलं पहिलं अक्षर व्यंजन आहे.'' (पृ.४४) अशा स्पष्टीकरणांचा उलगडा होत नाही. पान ४८वर ''स्वराच्या सोबत '-' ही खूण वापरली आहे. याचा अर्थ हा की येथे कोणतेही व्यंजन उपयोगात आणता येईल. 'ऑ'चा उपयोग अधिक सोयीस्कर असल्याने त्याचा वापर केला आहे.'' अशा स्पष्टीकरणांचा अर्थ अजिबात उमगत नाही. ह्या स्पष्टीकरणानंतर येणाऱ्या एका उदाहरणात शब्दाची सुरवात 'ऑ' चिन्हानं होते, शिवाय लगेच एक स्वरचिन्ह येतं. ह्या दोहोंचा मिळून उच्चार 'ऱ्हस्व 'आ' आहे. मराठीत एकच 'आ' असल्याने अनेकवेळा थाई माणूस 'अ' म्हणाला की 'आ' हे समजत नाही.'' असे स्पष्टीकरण दिले आहे. पण त्या शब्दाचा उच्चार मात्र देवनागरीत 'अ-राय' असा दिला आहे. त्यामुळे दिलेल्या चिन्हाचा उच्चार ऱ्हस्व 'आ' आहे की 'अ' आहे, हे काही वाचकाला समजत नाही. त्याच पानावर उदाहरण दोनमधे दोन थाई चिन्हांचा उच्चार एकमेकांसारखा आहे, असं म्हटलं आहे. त्यावरून उच्चाराचा बोध काही होत नाही.

थाईमधे प्रत्येक चिन्हाचं कार्य मात्र अर्ध-स्वर, अर्ध किंवा पायमोडक्या व्यंजना-सारखं असावं. त्यामुळे थाईत अर्ध-व्यंजनासाठी वेगळी चिन्हं दिसत नाहीत. व्यंजनांची दोन चिन्हं आणि स्वराचं एक चिन्ह असेल, तर ते जोडाक्षर होतं. थोडक्यात, मराठीत अक्षर ओळख करून घेताना आपल्याला पूर्ण व्यंजन, अर्धव्यंजन, पूर्ण स्वर, अर्ध स्वर अशी चार प्रकारची चिन्हं शिकावी लागतात, तर थाई शिकताना एकूण फक्त दोन प्रकारची चिन्हं शिकावी लागतात, असा निष्कर्ष काढता येईल. पण प्रस्तुत पुस्तकात अशा तऱ्हेचं स्पष्टीकरण मिळत नाही.

थाई भाषेत वर म्हटल्याप्रमाणे केवळ दोन प्रकारची चिन्हं शिकावी लागत असली, तरी त्यामुळे ती शिकणं-समजावणं अजिबात सुकर होत नाही, कारण (१) मूळ स्वरचिन्हं १४ आहेत. पण ती जोडीनं किंवा गटानी वापरून एकूण ३४ स्वरचिन्हं होतात. (२) ही स्वरचिन्हं व्यंजनाच्या बरेचदा आधी आणि काही वेळा नंतर लिहिली जातात. (३) त्यातून ती सुटी असतात, मराठीसारखी मूळ व्यंजनाला जोडलेली नसतात. त्यामुळे स्वरचिन्हं आधीच्या की नंतरच्या व्यंजनाबरोबर वाचायची, हे शिकणाराला पटकन समजत नाही. (४) व्यंजनाच्या आधी येणारी बरीच स्वरचिन्हं आहेत. मराठीत फक्त ऱ्हस्व 'ि' हे अर्ध स्वरचिन्ह व्यंजनाच्या आधी येतं आणि तेही व्यंजनाच्या मुख्य उभ्या दांड्याला जोडलेलं असतं. पण थाईमधे स्वरचिन्हं आधी आणि मग व्यंजन येऊ शकतं. (स्वर) ''आय'' + ''र'' (व्यंजन) उच्चार मात्र

क्रम बदलून 'राय' असा करावा लागतो. (संपूर्ण शब्द 'अ-राय' पान ४८). (५) लोप पावलेले अलिखित स्वर असतात. उदा० 'ख' + 'न' ह्याचा उच्चार 'खोन'; पण 'ओ'साठी चिन्ह येत नाही, 'हॅ' + 'क' म्हणजे 'होक' असा हा शब्द वाचावा लागतो (पान ५३). (६) ह्या उलट स्वरचिन्हं लिहिली जातात, पण अनुच्चारित राहतात (पान ५९). (७) स्वरचिन्ह एक, पण त्याचे दोन वेगळे उच्चार (पान ५५), (८) किंवा दोन स्वरचिन्हांचा एकच उच्चार (पान ५८) अशी विविध गुंतागुंत असलेली स्वरप्रणाली मराठीतून मांडण्याचं कठीण काम इथे लेखकानं स्वीकारलं आहे, आणि बहुतांशी चांगलं पार पाडलं आहे.

थाईमधल्या व्यंजन व्यवस्थेमधेही नियम, उपनियम, पोटनियम, अपवाद आहेत. (१) एक चिन्ह शब्दात सुरवातीला, मधे किंवा शेवटी आलं, तर त्याचा उच्चार बदलतो. (२) एका उच्चारासाठी २ ते ५ वेगळी चिह्नं असल्याची उदाहरणं सापडतात. कोणत्या शब्दात कोणतं चिन्हं वापरायचं हे ठरलेलं आहे. (३) काही चिन्हं अनुच्चारित राहतात. त्यामुळे व्यंजनं पद्धतशीर मांडून त्यांचं स्पष्टीकरण देणं तसं सोपं नाही.

ह्या संदर्भातले डॉ. बापटांनी दिलेले तक्ते फार उपयोगी आहेत. उदा० स्वरचिन्हांचा तक्ता, अनियमित उच्चारांचे तक्ते, अलिखित स्वरांची माहिती, व्यंजन तक्ता. ह्या तक्त्यांमधे देवनागरीत उच्चार, शिवाय मराठीत अर्थ दिले आहेत. त्यामुळे थाई भाषेचे विशेष सहज समजतात. ह्यातले काही तक्ते प्रकरण तीनच्या सुरवातीला दिले, तर स्वरचिन्हांची ओळख करून देण्यासाठी उदाहरणादाखल दिलेले शब्द, विशेषत: व्यंजनं आणि त्यांचे देवनागरीत दिलेले उच्चार ह्यांचा मेळ घालणं सोपं जाईल.

क-ख, क-ग मधे भेद न करणं, द-ड, त-ट, भ-फ ची अदलाबदल शिवाय एका उच्चारासाठी अनेक चिन्हं, त्याखेरीज 'र' शेवटी आला तर त्याचा उच्चार 'न' आणि 'ज' शेवटी आला तर 'त' असे अनियमित उच्चार, ह्यामुळे प्रकरण तीन ह्या पुस्तकातलं सगळ्यात कठीण प्रकरण ठरतं. चिन्ह आणि उच्चार यांच्यातल्या वर उल्लेखलेल्या सर्व वैविध्यपूर्ण नात्यांत अति कठीण गोष्टीची भर पडते ती 'आघात' चिन्हांनी. म्हणताना ह्याला 'आघात' चिन्हं म्हटलं असलं, तरी त्या चिन्हांवरून उच्चार कळणं फार अवघड आहे. स्वत: लेखकानं म्हटल्याप्रमाणे ''उच्चारातील आघात समजण्यासाठी थाई माणसाचे बोलणेच ऐकले पाहिजे.'' (पान ९६) याचं मुख्य कारण म्हणजे ''आघात एक म्हणजे खालच्या स्तरावरील आघात, दोन म्हणजे घसरत्या सुरातील आघात, तीन म्हणजे उच्च सुरातील आणि चार म्हणजे चढत्या सुरातील आघात'' (पान ९९) असं स्पष्टीकरण लेखकानं दिलं आहे. लेखक ह्या चिन्हांचे 'हेल', 'स्तर' आणि 'आघात' असे तीन गुणधर्म सांगतो. थाई व्यंजनं

उच्च स्तरीय, मध्य स्तरीय, निम्न स्तरीय आहेत. त्यात वापराप्रमाणे बदल, उपनियम, अपवादही आहेत. ह्या गोष्टींचं वाचून आकलन होणं अवघड आहे. थाई भाषा ही चिनी भाषेसारखी 'टोनल' भाषा असावी, असं वाटतं. चिनीमधे एकच शब्द वेगळ्या 'टोन'मधे म्हटला की त्याचा अर्थ बदलतो. असंच काहीसं थाई भाषेतल्या आघातबद्दल लेखकाला अभिप्रेत असावं म्हणून थाई भाषा शिकताना पुस्तकाबरोबर भाषा ऐकण्याची सुविधा कॅसेट किंवा सीडीवर - उपलब्ध असणं आवश्यक आहे.

प्रकरण चारमध्ये 'शब्दविचारा'त विविध शब्दप्रकारांची चर्चा आली आहे. तसंच जोडशब्द, त्यांचं महत्त्व, त्यांचा अर्थ, त्यांचं कार्य ह्याची माहिती आहे. थाई भाषेत कोणत्याही शब्दांची रूपं बदलत नाहीत. अगदी क्रियापदांची सुद्धा - म्हणजे खरं तर थाईमधे 'क्रियापद' असं नसावं. म्हणूनच लेखकानं 'क्रियावाचक' शब्द असा शब्दांचा गट मानला आहे. काळ वेगवेगळ्या शब्दांच्या, क्रियाविशेषणांच्या साहाय्याने दर्शवले जातात. तऱ्हतऱ्हेच्या क्रियाविशेषणांची आणि अव्ययांची उदाहरणे देऊन मोठेल्या वाक्यांची यादी तयार केली आहे. प्रत्येक वाक्याचा उच्चार देवनागरीत आणि अर्थ मराठीत दिला आहे. पण वाक्यातला पदांचा अर्थाशी मेळ कसा घालायचा हे बरेचदा समजत नाही. हीच अडचण प्रकरण पाचमध्येही आहे.

जोड शब्दांचे उपप्रकार, संस्कृत शब्द, ही उपप्रकरणं खूप माहिती देणारी आणि भाषेतली रुची वाढवणारी आहेत. पण सर्वात जास्त थाई भाषेतील खाचखळगे, वेगळेपणा दाखवणारं उपप्रकरण आहे ते म्हणजे थाई शब्दकोशाच्या वापरासंबंधीचं. ह्या प्रकरणात नमूद केलेल्या बारकाव्यांवरून लक्षात येतं, की लेखकाचा थाई भाषा शिकण्याचा आणि वापरण्याचा अनुभव फार व्यापक आहे.

थाई भाषेची वर्गवाचक शब्द वापरण्याची लकबही मराठीपेक्षा अगदी वेगळी आहे. उदा० मांजर म्हणताना प्राणीगटाचा शब्दही वापरावा लागतो आणि मोटार म्हणताना वाहनदर्शक शब्दही वापरावा लागतो (पान १५२-१५३). एकूण थाई भाषेतल्या शब्द-निर्मितीची रीतही जरा वेगळी वाटते. आपण एका देशाच्या माणसाबद्दल बोलताना तो 'भारतीय' आहे, तो 'जर्मन' आहे, असं म्हणू. थाईमधे 'माणूस जर्मन' 'माणूस इंडियन' असं म्हटलं जातं. (पान ८९)

पाचव्या म्हणजे शेवटच्या प्रकरणात थाई वाक्यरचनेचे विशेष सुरवातीला दिले आहेत आणि मग उदाहरणे दिली आहेत. थाई भाषेत शब्द एकमेकांना जोडून एकापुढे एक लिहितात. विरामचिन्हं नसतात. अगदी प्रश्नचिन्हंसुद्धा वापरत नाहीत. थाई भाषेत संधी नाहीत, इत्यादी.

ह्या माहितीनंतर सुट्या वाक्यांची उदाहरणं उच्चार आणि भाषांतरासकट दिली

आहेत, आणि ती व्यवहारोपयोगी संदर्भात दिली आहेत. उदा० बँक, हॉटेल, करमणूक, विनंती इत्यादी तसंच आकडे, कालमापन, प्रश्नार्थी अव्यय, वाक्प्रचार, आहार-पेयं, आरोग्य, प्रेक्षणीय स्थळं, इत्यादी माहितीमुळे ह्या पुस्तकाची उपयुक्तता खूप वाढली आहे.

काही ठिकाणी मात्र शब्द आणि वाक्यरचना बुचकळ्यात टाकणारी आहे, तसंच काही संज्ञांचा वापर काटेकोरपणानं केलेला नाही. उदा० अक्षर-वर्ण, अक्षर-व्यंजन, महाप्राण असलेली अक्षरं की वर्ण की उच्चार, प्रत्यय की उपसर्ग, आघात किंवा हेल किंवा उच्चारस्तर, शब्दाचा अर्थ आणि शब्दाचं कार्य, ग्रंथ भाषा की लिपी, स्वरचिन्हं की अक्षरं, इत्यादी. काही माहिती आणि वाक्यं खूपदा आली आहेत. क्वचित एका पानावर दोनदा तीच वाक्यं आली आहेत.

ह्या पुस्तकाची एकूण रचना सोपी नाही. प्रत्येक अक्षर, शब्द, वाक्य थाईत देऊन त्याचा देवनागरीत उच्चार आणि मराठीत अर्थ, हे किचकट आणि कष्टाचं काम आहे. मुळात थाई लिपी मिळवून तिचं टंकलेखन आणि छपाई करून घेणं, पुस्तकात सातत्यानं दोन लिप्या वापरणं हे सोपं काम नाही. हे आव्हान लेखक-प्रकाशक-मुद्रक यांनी यशस्वीपणे पेलून थाई भाषा शिकायला उपयोगी असं एक रंजक पुस्तक वाचकाला उपलब्ध करून दिलं आहे.

■

**परकीय भाषा विभाग, पुणे विद्यापीठ**

## भाषा : आपला ध्यास

भाषा हा आपला श्वास आहे, आपलं असणं आहे, जगणं आहे, आपला आपल्या समाजाशी असलेला दुवा आहे. आपल्या भावनांचा हुंकार आहे, जगण्याचा आनंद भरभरून लुटण्याचं साधन आहे.

- **मंगला गोडबोले**, दै. सकाळ, २५-५-२००५

पुस्तक परीक्षण

# जागरूक शिक्षिकेची धडपड

वाभाजी पुणेकर

[परीक्षित पुस्तके : (१) 'मराठी भाषा अध्यापनातील क्षेत्रप्रयोग', पृष्ठे १४३, किंमत रु. १२५/- (२) 'जागरूक वर्गशिक्षक', पृष्ठे ९२, किंमत ७५/-, राजकुँवर सोनवणे, अनुबंध प्रकाशन, पुणे ४३]

शिक्षण क्षेत्रात शिक्षणाचा दर्जा हा नेहमीच चिंतेचा आणि चिंतनाचा विषय असतो. अभ्यासक्रमानुसार वर्गात पाठ्यपुस्तक शिकविणे आणि परीक्षा घेणे अशी एक घट्ट चाकोरी या क्षेत्रात आहे. शिक्षकांची वाटचाल त्यातूनच होते. ती वाटचाल आनंददायी करण्यासाठी शिक्षकांमध्ये कौशल्य हवे. शिक्षकीपेशाविषयी जिव्हाळा हवा. उपक्रमशीलता हवी, हौसही हवी. त्यातून अध्यापनाकडे पाहण्याची नवी दृष्टी मिळते. त्याची झलक दाखविणाऱ्या राजकुँवर गंगाधर सोनवणे या शिक्षिकेने या दोन पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत.

श्रीमती सोनवणे यांनी मराठी विषयाचे अध्यापन करताना विद्यार्थ्यांना भाषा विषयाची गोडी वाटावी व वाढावी म्हणून लहान मोठे उपक्रम राबविले. त्याच्या खाचाखोचांचे विवेचन 'मराठी भाषा अध्यापनातील क्षेत्रप्रयोग' या भारदस्त शीर्षकाच्या पुस्तकात आहे. आठ विभागात त्याची मांडणी आहे.

निबंध लेखन - तंत्र व मंत्र, (त्यात नमुन्याचे निबंधही आहेत.) त्यासाठी केलेले हस्तलिखितादी प्रयोग, शुद्ध शब्द, वाक्प्रचार, हस्ताक्षर सुधारणा उपक्रम, वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेले लेख असे या पुस्तकाचे स्वरूप आहे. काही प्रयोगांच्या निष्कर्षांचे दर्शनासाठी कोष्टके, तक्ते व आलेख नोंदविले आहेत.

भाषा - शिक्षकांसाठी हे काही अगदी नवे नव्हे. ते यथाशक्ती हे सारे खटाटोप करीतही असतात. पण नोंदी वगैरे ठेवण्याच्या फंदात ते पडत नाहीत. हे सारे परीक्षेतील यशासाठी कितपत उपयुक्त ठरेल, अशी शंका यावी, असा परीक्षा हा प्रकार सांप्रत दिसतो. त्याचाही तो परिणाम असावा.

विवेचनाची भाषा सरधोपट आहे. नमुनेदार निबंध पाल्हाळीक आहेत. अनावश्यक तपशिलाची भरताडही आहे. लेखनात सुटसुटीतपणाचा अभाव जाणवतो. 'राजहंस माझा निजला' हा कल्पनाविलासी (?) निबंध म्हणजे एका कबुतरणीच्या पिल्लास कावळ्याने मारले, ही गोष्ट आहे. कदाचित निबंधाचा विषय व त्याखालचे विवेचन कसे नसावे, हे सूचित करण्याचा, त्यामागे हेतू असावा ! निबंधलेखनातील अवतरणेही अधिक तारतम्याने वापरायला हवी होती. 'तरच मराठी प्रदूषणाला आळा बसेल' हा लेख मात्र दर्जेदार आहे. तो दर्जा पुस्तकभर दिसला असता तर दुधात साखर पडली असती. पण 'हौसेला मोल नसते' या न्यायाने लेखिकेची धडपड समजून घ्यायला हवी, यात शंका नाही.

'शिक्षणाचा 'केंद्रबिंदू' विद्यार्थी आहे असे गृहीत धरूनही शिक्षकसुद्धा शिक्षणाचा आत्मा आहे हे मान्य करावे लागते.' 'वर्गशिक्षक हा ह्याच्या वर्गाचा शिल्पकार असतो.' अशा गुळगुळीत वाक्यांच्या चिंतनातून निघालेले 'नवनीत' म्हणजे श्रीमती सोनवणे यांचे 'जागरूक वर्गशिक्षक' हे पुस्तक. शिक्षकांची निष्क्रीयता गृहीत धरूनच या पुस्तकाची मांडणी केली आहे. जोडीला -

*'जो शिक्षक जाणे विद्यार्थ्यांचे मन*
*तोच त्यांच्यापर्यंत पोचवेल विद्याधन'*

अशा, सुविचारी पण ओबडधोबड कविता आहेत. त्यामुळे आशयाला उणेपणा येतो. विद्यार्थ्यांकडून भरून घ्यायची प्रश्नावली, वर्गाचे व्यवस्थापन, विषयशिक्षक, पालकांशी संपर्क, विद्यार्थ्यांच्या समस्यादर्शक 'कळ्यांचे नि:श्वास', दै. सकाळमध्ये प्रसिद्ध झालेले लेख अशा लेखनांची गुंफण या पुस्तकात आहे.

'वैफल्य', 'उत्तर तुझे तपासताना' आदी कविता वाचल्यावर तो प्रांत लेखिकेचा नाही ही जाणीव तीव्र होते. वर्गातील विद्यार्थ्यांचे मंत्रिमंडळ, दत्तक विद्यार्थी-पालक योजना, पालक सभा या गोष्टींची आता अपूर्वाई राहिलेली नाही. याबाबत नवा किंवा व्यावहारिक विचारही लेखिकेला गवसलेला दिसत नाही. तरीही होतकरू शिक्षकांनी हे पुस्तक जागरुकतेने डोळ्यांखालून घातले पाहिजे. ■

९०५, डेक्कन जिमखाना, पुणे ४११ ००४.

## सूचना

''भाषा आणि जीवन''च्या वार्षिक वर्गणीसाठी जानेवारी ते डिसेंबर असे वर्ष मानलेले आहे. त्यामुळे ह्या दिवाळी अंकाबरोबर वार्षिक वर्गणीदारांची वर्गणी संपते. त्यांनी नवीन वर्षाची वर्गणी शक्य तितक्या लौकर पाठवावी.









# दोन कवितासंग्रह

नीलिमा गुंडी

## १ स्त्रीचा धीट उच्चार

[ 'तत्पुरुष', कविता महाजन, तुला प्रकाशन, औरंगाबाद, २००५, पृष्ठे ११२, मूल्य रु. ११०/-]

नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध होणाऱ्या कवितांमुळे जाणकार वाचकांचे लक्ष वेधून घेतलेल्या कविता महाजन यांचा 'तत्पुरुष' हा पहिलाच काव्यसंग्रह स्त्रीवादी विचारसरणीचा स्पष्ट ठसा असलेला आहे. स्त्रीवादी विचारसरणीचे वैयक्तिक अनुभवांशी नाते जुळल्यामुळे यातील कविता मनाला भिडतात. 'स्त्रीपुरुष' हा द्वंद्वसमास उभय पदांना समान स्थान देण्याऐवजी आपल्या समाजात कसा 'तत्पुरुषी' होतो आणि पुरुषप्रधान व्यवस्थेत स्त्रीचे जगणे कसे गुलामाचे ठरते, याचे दर्शन यातील कवितांमधून घडते. ६१ कवितांचा समावेश असलेल्या या संग्रहात काही कविता 'मालक-गुलाम' या रूपकाच्या भाषेतून स्त्रीचे शोषण शब्दबद्ध करतात.

*''गुलामाचं स्थान*
*मालकाच्या पायाशी असतं*
*मालक म्हणतात कधी, की*
*हृदयाशी असतं.''* (पृ. ३६) अशा शब्दात कवयित्री पुरुषी प्रेमातली मालकी हक्काची स्वार्थी छटा कडवट उपरोधाने नेमकी पकडते. स्त्रीच्या जगण्यात व्यापून राहिलेली भीती कवयित्री दैनंदिन जगण्यातील तपशिलांना प्रतिमारूप देऊन व्यक्त करते. मालक नसलेल्या स्त्रीला इतर स्त्रियांकडून मिळणारी वागणूकही येथे उपरोधिक सुरातून व्यक्त होते. (पाहा : कविता 'शालीन')

'पापी आत्म्याचा प्रवास' आणि 'या उघड्या क्षणापासून' या कविता वाचताना कवयित्री भावकवितेच्या जातकुळीची दीर्घकविता लिहू शकते, याची खात्री पटते. 'तडजोडीची एक मुंगी', 'भयाचं गवत' चरणारा 'मनाचा ससा' 'मौन हीच किंकाळी', 'शब्दाचा शुभ्र इवला दात', कुंकवात दिसणारा 'लालभडक पूर्णविराम' या प्रतिमा काव्यात्म आहेत. शोषणाच्या दाहक अनुभवात आत्मशोध घेणारी, आत्मबळासरशी जगण्याची नवी उभारी घेणारी कविताही यात वाचायला मिळते. 'पुनर्विचार' या कवितेतील या ओळी पाहा :

*''बाई ओलांडते बाईपणाची मर्यादा*
*विणू लागते एक स्वेटर*
*स्वत:च्या उबेसाठी''* (पृ. ५१)

हा यातला नवा सूर महत्त्वाचा आहे. मात्र सर्व कविता एकाच अनुभवाभोवती केंद्रित झाल्यामुळे काही वेळा कविता एकसुरी वाटू लागतात. जगण्यातले इतर अनुभवही कवयित्रीने स्वीकारायला हवेत.

**२ आंतरिक नि:शब्दतेचा प्रत्यय**

['वाळूच्या पात्रात मांडलेला खेळ' : अनुराधा पाटील, तुला प्रकाशन, औरंगाबाद, २००५, पृष्ठे ८७, मूल्य रु. ८०/-]

'दिगंत', 'तरीही', 'दिवसेंदिवस' या संग्रहांमुळे स्वत:ची अशी ओळख प्राप्त झालेल्या कवयित्री अनुराधा पाटील यांचा नवा संग्रह नुकताच प्रकाशित झाला आहे. 'वाळूच्या पात्रात मांडलेला खेळ' या शीर्षकाच्या प्रस्तुत संग्रहात २७ कविता आहेत. अनुराधा पाटील यांची कविता समकालीन वास्तव कवेत घेत असतानाच जगण्याच्या शाश्वत प्रवाहावर भाष्य करीत असते. या संग्रहाचे शीर्षकही यादृष्टीने सूचक आहे. कवयित्रीने हा संग्रह 'आईला आणि माझ्या कवितेत वावरणाऱ्या सगळ्या बायांना' अर्पण केला आहे. या संग्रहात काही स्त्रीकेंद्री कविताही आहेत.

'आई', 'बाई तसं तर', 'ती पान लावते', 'पोरी' या कविता कवयित्रीची स्त्रीच्या जगण्याकडे पाहण्याची स्वतंत्र संवेदनशक्ती लक्षात आणून देतात. स्त्रीच्या दु:खभोगाचे तरल चित्रण करताना त्या दु:खाचे उदात्तीकरण करीत नाहीत, तसेच दु:खाचे प्रदर्शनही करीत नाहीत. संयमशील मनाने केलेला दु:खाचा स्वीकार आणि संवेदनशीलतेने दु:खाला घातलेला बांध, हे त्यांच्या स्त्रीकेंद्री कवितांचे एक वैशिष्ट्य आहे.

*''पण आपल्यापासून*
*मैलोगणती दूरच राहते*
*आयुष्य नावाच्या जळवांनी*
*पोखरलेली खरीखुरी बाई''* (पृ.२५) याचे भान त्यांच्यातील कविमनाला असते. आणि शेवटी कवी म्हणजे तरी कोण असतो ? त्या लिहितात :

*''शेवटी कवी तर काय असतो ?*
*नुसताच शब्द पाहिलेला माणूस''* (पृ. ८५) म्हणूनच कवयित्री अनेकांच्या मनांतली नि:शब्दाच्या पातळीवरची उलथापालथ हलकेच शब्दबद्ध करते. 'ओसाडीची वारी' करणाऱ्या, मुकाट्यानं जगण्याच्या पालखीचं ओझं वाहणाऱ्यांविषयीची करुणा

हा या काव्यामागचा प्रेरणास्रोत आहे. 'पण चेहरा असो कवितेला, विनाशानंतर उगवणाऱ्या, पहिल्या किरणांचा' (पृ. ४४) असा आशावादही या संग्रहात आढळतो. 'आता पाऊस येईल', 'किती वर्षांत', 'जरी त्याच्या इच्छेशिवाय' या कविता विशेष लक्षात राहतात. यातील 'अफवांची अहिल्या', 'जगण्याचं ताक फुंकून पिणं', 'टिकलीबांगडीचं चिमूटभर स्वातंत्र्य', अशा काही वेगळ्या प्रतिमा आणि घरगुती स्त्रीबोलीचा ठसा असलेली शब्दकळा लक्ष वेधून घेतात. मात्र आत्मसंवादाची लय आणि जीवनविषयक ठरावीक भाववृत्तींचे चित्रण याबाबतीत हा संग्रह याआधीच्या संग्रहांतील काही वळणेच गिरवताना दिसतो. ■

१२५९, शुक्रवार पेठ, पुणे २.

## श्रुतयोजनाची काही उदाहरणे

संस्कृतचा आणि मराठीचा घनिष्ठ संबंध आहे, म्हणून की काय, आपल्या सर्व संत आणि पंडित कवींनी संस्कृतमधील काव्यकल्पनांची भरपूर उचल आपल्या ओवीअभंगांतून केलेली दिसेल. ज्ञानदेव-तुकारामही याला अपवाद नाहीत. एक सुंदर संस्कृत सुभाषित आहे :

'बन्धनानि खलु सन्ति बहूनि । प्रेमरज्जुकृतबन्धनमन्यत् ।
दारुभेदनिपुणोऽपि षडंघ्री । निष्क्रियो भवति पंकजकोशे ।'

या सुभाषिताचा वापर ज्ञानदेव आपल्या काव्यात करतात :

जैसा भ्रमर भेदी कोंडे । भलतैसें कण्ठ कोरडें ।
परि तो कमळकळिकेमाजीं सांपडे । कोंवळीये ॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परि ते कमळदल चिरूं नेणें ।
ऐसें कठिण कोंवळेपणें । स्नेह देखा ॥

हे श्रुतयोजनच आहे. त्याच्याही जरा पुढे जाऊन तुकाराम अगदी एका ओळीत त्याच कल्पनेचा पडसाद उमटवताना आढळून येतात. ते म्हणतात, 'नाही काष्ठासी गुमान । गोवी भ्रमरा सुमन ।' त्याचप्रमाणे तुकारामांनी 'वज्रादपि कठोराणि । मृद्‌नि कुसुमादपि' या संस्कृत ओळीची प्रतिकृती 'मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदू ऐसें' या ओवीमध्ये वापरलेले आढळून येते.

**शान्ता ज. शेळके**

('श्रुतयोजन की वाङ्मयचौर्य' 'जाणता-अजाणता', महाराष्ट्र टाइम्स, ३.९.९४)

प्रेषक : सत्त्वशीला सामंत, पुणे.










# 'दुर्मिळ' की 'दुर्मीळ' ?

एक वाचक

काही शब्दांचे लेखन कसे करावे याबाबत मराठीभाषकांत एकवाक्यता आढळत नाही. उदाहरणार्थ, 'दुर्मिळ' हा शब्द बरोबर की 'दुर्मीळ' ? या बाबतीतील मत-मतांतरे पुढीलप्रमाणे :

दुर्मिळ : 'शुद्धलेखन शुद्धमुद्रण शब्दकोश.' दि पूना प्रेस ओनर्स असोसिएशन लि. १९६१.

दुर्मिळ : यास्मिन शेख 'मराठी लेखन मार्गदर्शिका' राज्य मराठी विकास संस्था, मुंबई १९९७, पृ. १५२.

दुर्मीळ : डॉ. द. न. गोखले 'शुद्धलेखन-विवेक' सोऽहम् प्रकाशन, पुणे, १९९३, पृ. १२५, (पान ७३ विवेचन)

दुर्मीळ : अरुण फडके 'शुद्धलेखन तुमच्या खिशात', नितीन प्रकाशन, पुणे (आवृत्ती २) २००२. पृ. ९४. (यांनी कंसात दुर्मिळ असे लिहून त्याच्यापुढे फुली मारली आहे !)

या शब्दाचे मूळ लेखन ''दुर्मिळ'' असे आहे हे स्पष्ट दिसते. महामंडळाच्या शुद्धलेखनविषयक नियमांना अनुसरून ते 'दुर्मीळ' असे करावे, असे डॉ. गोखल्यांचे मत आहे. अरुण फडक्यांनी कारण दिलेले नसले तरी हेच कारण त्यांना अभिप्रेत असावे.

या परिस्थितीत शिक्षकांनी काय करावे ? विद्यार्थ्यांना काय सांगावे ? कोणते लेखन अधिकृत मानावे ?

■

## प्रतिसाद

--

जाई निंबकर

मराठीविषयीच्या (किंवा खरं म्हणजे भाषेविषयीच्या) अनास्थेला जबाबदार आणखी एक कारण आहे. शास्त्रशाखेकडे जाणाऱ्यांना कसलेही भाषाकौशल्य नसले तरी चालेल अशी दृढ समजूत शिक्षणविषयक धोरणामुळे निर्माण झाली आहे. ग्रुपमध्ये किती गुण किंवा पी.सी.बी.ला किती गुण एवढेच फक्त शास्त्रशाखेत प्रवेश घेणाऱ्यांना विचारले जाते. पण इतर कुठल्याही विषयाप्रमाणे अध्ययन आणि लेखन (जे शास्त्राच्या विद्यार्थ्यांनाही करावे लागते.) ह्यासाठी भाषाकौशल्याची, भाषासमृद्धीची गरज असते हेच आपण अमान्य केले आहे.

वैकल्पिक लिंगे ह्यातील माझा एक अनुभव : एका बाईने मला सांगितले, 'मुलासाठी मी एक चांगला जागा पाहिला आहे.' आधी मला वाटलं तिची काहीतरी चूक असावी. पण 'स्थळ' ह्याअर्थी 'जागा' हा शब्द वारंवार पुल्लिंगीच वापरलेला ऐकला. पूर्वी असा ऐकण्यात आला नव्हता.

■

**फलटण**

# नववी सर्वसाधारण सभा

मराठी अभ्यास परिषदेची नववी वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार, दि. २६ जून २००५ला पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या राजवाडे सभागृहात संध्याकाळी पाच वाजता डॉ. अशोक रा. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आली होती. पुरेशा गणसंख्येअभावी सभा १५ मिनिटे स्थगित करून ठीक सव्वापाच वाजता सभेचे कामकाज त्याच ठिकाणी सुरू करण्यात आले.

सर्वप्रथम गतवर्षी दिवंगत झालेले डॉ.प्र.न. जोशी, डॉ.रा.भा. पाटणकर, डॉ. देवीसिंग चौहान तसेच दि. २३ जून २००५ रोजी दिवंगत झालेले डॉ. हे.वि.इनामदार यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी आठव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त सादर केले. त्याला ठरावाद्वारे मान्यता देण्यात आली. डॉ. मो.गो.धडफळे हे सूचक तर श्री. किसन होळकर अनुमोदक होते.

त्यानंतर डॉ. नीलिमा गुंडी यांनी गतवर्षातील उपक्रमांविषयीचे कार्यवृत्त सादर केले. गतवर्षातील उपक्रमांमध्ये महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्काराचे समारंभपूर्वक वितरण (१८ डिसेंबर, २००४), मराठी अभ्यास परिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या वतीने आयोजित करण्यात आलेले ''शालान्त परीक्षेतील मराठी विषयाचा चिंताजनक निकाल : कारणे व उपाय'' या विषयावरील चर्चासत्र (१९ डिसेंबर, २००४), तसेच महाराष्ट्र दिनाचे औचित्य साधून परिषदेतर्फे आयोजित करण्यात आलेला ''प्रसारमाध्यमे आणि मराठी भाषेचा विकास'' या विषयावरील परिसंवाद (१ मे, २००५), या कार्यक्रमांचा समावेश होता.

परिषदेच्या 'भाषा आणि जीवन' या पत्रिकेने २३व्या वर्षात पदार्पण केले असून गतवर्षी वार्षिक वर्गणीदार १७५, संस्था वर्गणीदार ९५, परदेशस्थ वर्गणीदार १५ तसेच आजीव सदस्यसंख्या २८५ असल्याची माहिती सभागृहाला देण्यात आली. हे कार्यवृत्त मंजूर करण्याविषयीच्या ठरावाची सूचना श्रीमती सुमन करंदीकर यांनी केली व डॉ. विजया देव यांनी अनुमोदन दिले.

कोषाध्यक्ष डॉ. गं.ना.जोगळेकर यांनी २००४-२००५ या आर्थिक वर्षाचा लेखापरीक्षित ताळेबंद आणि २००५-२००६ या आर्थिक वर्षासाठीचा अर्थसंकल्प सभेपुढे सादर केला. ताळेबंद व अर्थसंकल्प एका ठरावाद्वारे मंजूर करण्यात आले. डॉ. विद्यागौरी टिळक या सूचक तर श्रीमती विजया चौधरी अनुमोदक होत्या.

याचबरोबर, येत्या आर्थिक वर्षासाठी लेखापरीक्षक म्हणून श्री. ए.जे.दिघे व कायदेविषयक सल्लागार म्हणून ॲड. पराग देशपांडे यांच्या पुनर्नियुक्तीचा ठराव संमत करण्यात आला. श्री. शरच्चंद्र बडोदेकर या ठरावाचे सूचक तर श्री. श्रीधर देशपांडे अनुमोदक होते.

श्री. मो.गो. धडफळे यांनी 'भाषा आणि जीवन'चे जुने अंक विविध वाचनालयांना भेट म्हणून पाठवावेत अशी सूचना केली. श्रीमती सुमन करंदीकर यांनी जुन्या अंकांची सी.डी. करावी असा प्रस्ताव मांडला. श्री. शरच्चन्द्र बडोदेकर यांनी 'महाराष्ट्र टाईम्स' या मराठीतील अग्रगण्य वृत्तपत्राने रविवारची 'पुणे टाईम्स संवाद' ही पुरवणी बंद करून त्या ऐवजी 'टाईम्स ऑफ इंडिया' या इंग्रजी वृत्तपत्राची इंग्रजी पुरवणी पुणे येथील वाचकावर लादल्याबद्दल व्यवस्थापनाचा निषेध करणारा ठराव मांडला व प्रा. प्र.ना.परांजपे यांनी त्यास अनुमोदन दिले. हा ठराव एकमताने मंजूर झाला.

याच पार्श्वभूमीवर, अध्यक्षांच्या परवानगीने काही मते मांडण्यात आली तसेच काही सूचनाही पुढे आल्या. श्रीमती सुमन करंदीकर यांनी 'भाषा उत्तम तर जीवन उत्तम' या प्रेरणेतून परिषदेने शिक्षकांसाठी एक पुस्तिका तयार करावी व शिक्षकांमार्फतच ती मुलांपर्यंत पोचवावी असा विचार मांडला. श्री. शरच्चन्द्र बडोदेकर यांनी वृत्तपत्रांतून वापरले जाणारे चुकीचे मराठी शब्दप्रयोग व त्यावरील हिंदीचा वाढता प्रभाव याविषयी चिंता व्यक्त केली. प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर यांनी व्यापारीकरणामुळे प्रसारमाध्यमांची भाषा सुधारण्यावर मर्यादा आहेत हे स्पष्ट केले व डी.टी.पी. ऑपरेटरांसाठी परिषदेतर्फे शुद्धलेखनाचे वर्ग घ्यावेत अशी व्यावहारिक सूचनाही केली. डॉ.गं.ना.जोगळेकर यांनी मोठ्या वृत्तपत्रांनी किमान एक तरी भाषातज्ज्ञ नेमण्याची गरज असल्याचे सांगितले व वृत्तपत्रांची वाचकाला गृहीत धरण्याची वृत्ती व अमराठी लोकांच्या हातात असलेला वृत्तपत्र व्यवसाय यामुळे होणाऱ्या परिणामांविषयी चिंता व्यक्त केली. प्रा.प्र.ना. परांजपे यांनी मराठी अभ्यास परिषदेने एक गट किंवा यंत्रणा तयार करावी व त्याद्वारे अनेकांच्या विविध प्रकारच्या भाषाविषयक शंकांचे निरसन करण्याचा उपक्रम सुरू करावा अशी सूचना मांडली.

डॉ. अशोक रा. केळकर यांनी मराठी वाचकाची परिस्थिती-शरणता व निषेध न करण्याची वृत्ती हे विकासाच्या प्रक्रियेतील मोठेच अडथळे ठरतात, असे आपल्या अध्यक्षीय समारोपात सांगितले. समृद्ध मराठीसाठी भाषाविषयक आपुलकी जोपासण्याची आवश्यकता आहे असे ते म्हणाले.

डॉ. सुप्रिया सहस्रबुद्धे यांच्या आभार-प्रदर्शनानंतर सभा विसर्जित झाली. ■

**विजया चौधरी, इ-५०३, गार्डन व्ह्यू, राधिका सोसायटी,**
**पर्वतीनगर, सिंहगड रोड, पुणे ३०. फोन : २४२५०५५९**










## भाषा आणि जीवन २००५ : लेखनसूची

मृणालिनी शहा

### लेखक सूची :

पाटणकर जयश्री/उपयुक्त संकलन/पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तक : मराठी भाषा सौष्ठव - म्हणी - अलंकार, वसंत उत्पात, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, २००३)/२३:२ उन्हाळा/५२

पाटील शिवाजी/ वैदू समाजाचा भाषिक व्यवहार/२३:४ दिवाळी/४२

पुणेकर वाभाजी/जागरूक शिक्षिकेची धडपड /पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तके : 'मराठी भाषा अध्यापनातील क्षेत्रप्रयोग' आणि 'जागरूक वर्गशिक्षक', राजकुँवर सोनवणे, अनुबंध प्रकाशन, पुणे/२३:४ दिवाळी/७२

बडवे नीती/ थाई भाषा शिका / पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तक : 'थाई भाषा शिका', डॉ. एन.जी. बापट, नितीन प्रकाशन, पुणे, २००४/२३:४ दिवाळी/६७

बर्नसन मॅक्सीन / लर्निंग मराठी ॲज अ फॉरिन लॅग्विंज् : नीटनेटके, उपयुक्त/ पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तक : लर्निंग मराठी ॲज अ फॉरिन लॉंग्विज्, भाग १ व २, डॉ.नीती बडवे, अक्षर साहित्य, पुणे, २००३)/२३:३ पावसाळा/३५

बुरटे द.पां./नवे पारिभाषिक शब्द/२३:१ हिवाळा/११

बर्वे उज्ज्वला/चुकते कोठे?/२३:२ उन्हाळा/२८

बेलवलकर सुमन/कोशरचनेवरील सैद्धांतिक ग्रंथ/पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तक :'कोशवाङ्मय विचार आणि व्यवहार', डॉ.सदाशिव देव, सुपर्ण प्रकाशन, पुणे, २००२)/२३:४ दिवाळी/६१

बेलवलकर सुमन/मराठीचिये मंदिरी/पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तक : 'मराठीचिये मंदिरी', श्री.ना. चाफेकर, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे, २००४/२३:४ दिवाळी/६५

बेलवलकर सुमन/'मराठी भाषेचा इतिहास', डॉ.गं.ना. जोगळेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, २००५/२३:४ दिवाळी/५४

भट विवेक, मिलिंद मालशे (भाषांतरकार) सामाजिक भाषाभेद आणि भाषिक परिवर्तन : विल्यम ब्राइट, ए.के. रामानुजन/२३:२ उन्हाळा/६

भालसिंग वैशाली श्रीकृष्ण / चक्रधरांची लोकशिक्षणाची शैली/२३:१ हिवाळा/२३

भेंडे सुभाष/ऋषितुल्य संशोधक / पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तक : श्री.अ.का. प्रियोळकर : व्यक्ती आणि कार्य, डॉ. बि.बा. प्रभुदेसाई, रा.म.विं.सं, मुंबई २००३)/२३:२ उन्हाळा/५७

महाले कैलास/कोकणा समाजाचे भाषिक वेगळेपण/२३:१ हिवाळा/४६

मालशे मिलिंद / भाषांतरकार मूळ लेखक नोम जॉम्स्की/भाषेच्या अभ्यासाची नवी क्षितिजे/२३:४ दिवाळी/८

मोहिते शरदिनी/ संवाद/२३:४ दिवाळी/४८

रथ नीलकंठ/ओडिशा राज्य व ओडिया भाषा/प्रतिसादः१/२३:१ हिवाळा/५४

रुद्रभदे स्वामिनी/शालान्त परीक्षेतील मराठी विषयाचा चिंताजनक निकाल : कारणे व उपाय/२३:३ पावसाळा/२७

## लेखशीर्षक सूची :

**सं**दर्भसंपन्न, विवेचक आणि उपयुक्त/ विजया देव/पुस्तक परीक्षण (परीक्षित पुस्तके : भाषण रंग : व्यासपीठ आणि रंगपीठ आणि भाषण व नाट्यविषयक विचार, अशोक दा. रानडे, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९९५, २००१)/ २३:३ पावसाळा/५३.

**सं**वाद/शरदिनी मोहिते/२३:४ दिवाळी /४८

**सा**माजिक भेद आणि भाषिक परिवर्तन : विल्यम ब्राइट, ए.के. रामानुजन भाषांतरकार विवेक भट, मिलिंद मालशे/२३:२ उन्हाळा/६

**सि**नेमाची भाषा/श्रीपाद भालचंद्र जोशी/ २३:१ हिवाळा/४०.



लेखक परिचय

- **डॉ. द.भि. कुलकर्णी** - नागपूर विद्यापीठाच्या मराठी विभागाचे (निवृत्त) प्रमुख. नामवंत समीक्षक व लेखक
- **डॉ. नीलिमा गुंडी** - स. प. (कनिष्ठ) महाविद्यालयात मराठीचे अध्यापन. 'कविता : विसाव्या शतकाची'च्या सहसंपादक. काव्यसंग्रह, ललित लेखन, मुलांसाठी लेखन. दोन राज्य पुरस्कार.
- **म.ना. गोगटे** - बी.ई.(सिव्हिल) पुणे,एम्.एस्सी.(स्ट्रक्चरल एंजिनियरिंग) लंडन, सल्लागार आर्किटेक्ट/स्ट्रक्चरल एंजिनीयर (निवृत्त) संस्थापक व पूर्वाध्यक्ष, मराठी विज्ञान परिषद, सध्या पुणे शाखेचे संचालक.
- **वसंत आबाजी डहाके** - एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई येथून मराठीचे प्राध्यापक म्हणून निवृत्त. सुप्रसिद्ध कवी, ललितलेखक, चित्रकार, 'संक्षिप्त मराठी वाङ्मयकोश', 'वाङ्मयीन संज्ञा-संकल्पना कोश' यांचे सहसंपादक. काव्यसंग्रह व कादंबऱ्या प्रकाशित.
- **डॉ. सदाशिव देव** : गणिताचे (निवृत्त) प्राध्यापक. परदेशातही अध्यापन, संशोधन व मार्गदर्शन. सध्या भारतीय विद्याभवन (मुंबई) यांनी योजलेल्या आंतरराष्ट्रीय विद्यापीठ निर्मिती प्रकल्पाचे संचालक.
- **डॉ. माणिक धनपलवार** - उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद येथील मराठीचे (निवृत्त) प्राध्यापक.
- जाई निंबकर : सुप्रसिद्ध लेखिका, इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांत लेखन.
- **डॉ. शिवाजी पाटील** - सातारा येथील छत्रपती शिवाजी महाविद्यालयात मराठीचे प्रपाठक.
- **वाभाजी पुणेकर** - एम्.ए.,बी.एड्., प्रशाला व कनिष्ठ महाविद्यालयात मराठीचे अध्यापन.
- **डॉ. नीती बडवे** - पुणे विद्यापीठाच्या विदेशी भाषा विभागात जर्मनच्या प्राध्यापक. विदेशी विद्यार्थ्यांना मराठी शिकवण्याचा अनुभव. 'लर्निंग मराठी ॲज अ फॉरिन लँग्विज्' (भाग १ व २)चे लेखन.
- **डॉ. सुमन वासुदेव बेलवलकर** - 'लीळाचरित्रातील सामाजिकतेचे चित्रण' या विषयावर पीएच्.डी सर्व परीक्षांत प्रथम क्रमांक व अनेक पारितोषिके. राष्ट्रीय शिष्यवृत्ती, १९७०-८० विविध महाविद्यालयांत मराठीचे अध्यापन. १९८०पासून 'पश्चिम विभागीय भाषा केंद्र' येथे अमराठी विद्यार्थ्यांना मराठीचे अध्यापन, सध्या त्या केंद्राच्या प्राचार्य. 'बेलभाषा' हे पुस्तक व मराठीच्या अध्ययन - अध्यापनासाठी पाठ्यसामग्री प्रकाशित. लेख, परीक्षणे, मुलाखती, नभोवाणीवर भाषणे.
- **डॉ. मिलिंद मालशे** - आय्.आय्.टी. पवई (मुंबई)मध्ये इंग्रजीचे प्राध्यापक. मराठी व इंग्रजी-मधून लेखन.सौंदर्यशास्त्राचेही अध्यापन,'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन'-सह मराठी व इंग्रजी पुस्तके प्रकाशित. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक.
- **शरदिनी मोहिते (बाबर)** - मराठी व संस्कृत विषयांत एम्.ए. निरनिराळ्या ६० नियतकालिकां-मधून विविध विषयांवरचे लेख प्रकाशित, 'समाज शिक्षण माले'तून साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, शास्त्र, मानसशास्त्र इ. विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या, ऑल्विन टॉफ्लरचे 'थर्ड वेव्ह', शरच्चंद्र चतर्जींच्या 'देवदास' व 'परिणीता' यांची भाषांतरे प्रकाशित. 'समाज शिक्षण माले'च्या संपादनात व व्यवस्थापनात सहभाग.
- **डॉ. मृणालिनी शहा** - मॉडर्न महाविद्यालयात मराठीचे अध्यापन. 'मराठीचे भवितव्य' या पुस्तकाच्या सहसंपादक.

( १ ) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे.
वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/-,
व्यक्तीला रु. १००/-, पंचवार्षिक वर्गणी रु. ४५०/-
परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्चासाठी रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'भाषा आणि जीवन'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** (पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा.) धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **मागील अंक :** 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) काही अंकांचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/- आणि २००२ पासून प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २५/-.

(५) **जाहिरातीसाठी नवे दर :**
पूर्ण पान रु. २,५००/-, अर्धेपान रु. १,५००/-, पाव पान रु.८००/-,
शुभेच्छा सूचना रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/-
जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**मुखपृष्ठासंबंधी :**

विविध ऋतूंमध्ये निसर्गात होणाऱ्या बदलांचा चित्ररूप मागोवा घेण्यासाठी अक्षरांच्या साह्याने वातावरणनिर्मिती केली आहे. ही अक्षरे पूर्णपणे नवनिर्मित असून संगणकावरच घडली आहेत. म्हणजेच यात पारंपरिक लेखन-साधनांचा वापर अजिबात केलेला नाही. आजच्या 'संगणक-युगा'त सौंदर्य-निर्मितीसाठी संगणक वापरतानाच संगणकामुळे सहजसाध्य होणाऱ्या कलात्मक परिणामांमुळे आपल्याही दृश्यकलाविषयक जाणिवा समृद्ध होत आहेत.

चित्रकल्पना व अक्षर-निर्मिती : विनय सायनेकर; दृश्य संकल्पना व संगणकसाहाय्य : सुप्रिया खारकर, रेखाटने : वसंत आबाजी डहाके

---

